# उल्हास

कॉंग्रेसनें अधिकारग्रहण केलें तेव्हांच आजवर वर्ज्य असलेल्या विषयावर लेखन करण्याचा निश्चय केला, त्याचेंच फळ हें नाटक.

पहिल्यानें या विषयावरची चित्रपटकथा लिहिली गेली. पण ती घेण्याइतकें धैर्य चित्रपटांच्या उत्पादकांत नव्हतें. त्या चित्रपटकथेपेक्षां त्याच विषयावरील भिन्न कथानक कल्पून हें नाटक त्याचवेळीं—दीड वर्षापूर्वी लिहिलें गेलें.

गेल्यां ऑक्टोबरच्या पहिल्या आठवड्यांत या नाटकाच्या तालमी सुरू झाल्या होत्या. त्याचवेळीं ना. लठ्ठे यांनीं या नाटकाची हस्तलिखित प्रत नजरेखालीं घातली होती. योजनेप्रमाणें सर्व गोष्टी निर्वेध झाल्या असत्या तर हें नाटक १९३९ च्या जानेवारी महिन्यांत रंगभूमीवर आलें असतें—पण आज तरी ती करामत कोरडीच राहिली आहे.

म्हणूनच हें नाटक पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करण्याचें ठरवलें आणि माझे मित्र रघुनाथराव देसाई यांनीं निरपेक्ष बुद्धीनें तें काम पत्करलें.

एक ऑगस्ट १९३९ रोजीं मुंबई शहरांत पूर्ण दारूबंदी होणार आहे, त्यापूर्वींच हें नाटक प्रसिद्ध होत आहे. नाटक प्रचारात्मक असल्यामुळें तें शक्य तितक्या कमी किंमतींत देतां यावें म्हणून प्रत्येक पानांतील ओळींची संख्या वाढवून एकंदर पृष्ठसंख्या कमी करण्याची रघुनाथराव देसाई यांनीं जी योजना केली आणि इतर कामांची गर्दी असतांही झीज सोसून हें पुस्तक वेळीं प्रसिद्ध केलें, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

हाजी कासम वाडी,<br>मुंबई; ता. १ जुलै १९३९

**भा. वि. वरेरकर**

मुबई शहरांत

पूर्ण दारूबंदी करण्याची

घोषणा करण्याचें भाग्य

ज्यांनीं मिळविलें त्या

नामदार श्री. **अण्णा बाबाजी लठ्ठे**

अर्थसचिव मुंबई प्रांत

यांस अर्पण.

ॐनमो भगवते वासुदेवाय

# कोरडी करामत

## अंक पहिला

[ दारू दुकानाचा अंतर्भाग—प्रेक्षागृहाला समोर असलेला काउंटर—त्यामागें वेटरनां फिरण्यापुरती अगदीं बेताची जागा—त्यामागें दोन्हीं बाजूनीं बाटल्यांनीं भरगच्च भरलेलीं कपाटें—त्या कपाटांच्या दोन्ही रांगाच्या मध्यभागीं आंत जाण्याचा बंद असलेला दरवाजा. काउंटरच्या उजव्या बाजूला बाहेरून आंत येण्याचा दरवाजा. बाटल्यांच्या कपाटाच्या वर एक भलें मोठें घड्याळ—पडदा उघडतो त्यावेळीं एक वेटर काउंटर साफ करीत आहे. घड्याळांत ८–४० वाजले आहेत. एक क्षणभऱ्यानें घंटा वाजते आणि आंतल्या दरवाजानें मालक प्रवेश करतो. वेटर दचकून मुजरा करतो आणि पुन्हां झाडूं लागतो. काउंटरची मधली फळी उघडून मालक बाहेर येतो आणि एक क्षणभर घड्याळाकडे पाहतो. ]

**मालक**—किती वाजले ? आठ एकेचाळीस–ठीक ! एकोणीस मिनिटांनीं आज भरदिवसा कत्तलची रात्र सुरू होईल ! हं:—शेवटीं असं झालं ! ऐकलंस ? शेवटीं असं झालं ! काहीं उपयोग झाला नाहीं. एक एक गांवी प्रयत्न करतां करतां विश्वास आला या लोकांना ! भ्रम आहे म्हणावं, भ्रम आहे वरं ! दारुबंदी करणार म्हणे !—अमेरिकेनं देखील पिच्छेहाट घेतली तिथं हे इथं—जाऊं दे—बोला कशाला ? काय होईल तें दिसेल आपोआप ! असं पहा—आज शेवटचा दिवस आहे. तोंडाला येईल ती किंमत !—काय समजलास ?—आजच्या कॅशवरचे दोन आणे तुझे—कळलं ?—दोन आणे तुझे ! बेछूट किंमत सांगत जा—तोंडाकडे पाहायचं—कपडे पाहायचे—जरा अक्कल चालवायची आणि येईल तो आंकडा—हं !—काय समजलास ? दहाचे शंभर केलेस तरी कोण विचारायचा नाहीं आज !—ऐकलंस ? एकट्यानं झेपायचं नाहीं तुला आज—आणखी चार माणसं घे मदतीला—दहा घे—पंधरा घे—पण एक क्षण खोटी होतां नये कुणाची !—

**वेटर**—आज कोण मिळणार ? ज्याची त्याची आज लगीनघाईच आहे.

**मालक**—पडेल ती मजुरी दे—दुसरा कोण देईल त्याची दुप्पट कर—तिप्पट कर !—माझ्या परवानगीची वाट पाहूं नकोस. तुला आज पूर्ण मुखत्यारी देतें आहें ! समजलास ?—आज मालक तूं. मला आज कुठं तरी दृष्टीआड होऊन राहिलं पाहिजे. आतां गिल्ला करतील लोक—ऐक—( आंत कलकलाट ऐकूं येतो ) मी चाललों. मागं पुढं पाहूं नकोस. जन्माचं दारिद्य आज दूर झालं पाहिजे—तुझं अन् माझंही—गुड डे—( घाईनं उजव्या बाजूनें जातो. वेटर हंसतो )

[ स्थल—काल—परिवर्तन. स्वयंसेवकांचा तांडा कवाईतींत येतो. त्यांचा कॅप्टन प्रभास आहे. सर्व एका बाजूनें जातात. दुसऱ्या बाजूनें कॅप्टन फिरोज स्वयंसेविकांच्या पथकाला घेऊन जाते. ]

[ पुनः—स्थल—काल—परिवर्तन ]

[ सुरवातीप्रमाणेंच—उजव्या बाजूच्या बाहेरून येण्याच्या दाराकडून मालक येत असतो व डाव्या बाजूच्या दारानें आंतील पानगृहाकडून वेटर येतो. मध्यभागीं त्या दोघांची भेट होते, त्यावेळीं आंत बंद असलेल्या खोलींतून खूप आरडाओरड दारुड्यांची ऐकूं येत आहे. घड्याळांत—११—वाजलेले दिसत आहेत. मालक व वेटर बोलत असतां पुनः पुनः सारखे घड्याळाकडे पाहात आहेत ]

**मालक**—ठीक चाललंय् ना ? ( वेटर हंसतो ) ठीक—आतां असं करा तुम्हीं सारेजण. वेळ भरत चालली आहे—बाहेर पोलिस फेऱ्या घालताहेत, तसेच स्वयंसेवक देखील पिसाळलेयत्—अगदीं सावध राहायची वेळ आहे ही ! ऐक—असं कर—( मालक-नोकर भेद विसरून त्याच्या गळ्यांत हात टाकून कानगोष्टी करीत असतां उजव्या बाजूच्या दारावर धक्के बसत असतात ) कोण आहे ? धक्के द्यायला काय झालं ?

**आवाज**—( बाहेरून ) दार उघड—कुणी बंद केलं दार ? ( मालक दार उघडतो आणि आंत येणाराकडे हंसत मुद्रेनं पाहात असतां—वेटर आंत जातो—आंतील आरडाओरडा मधून मधून ऐकूं येत आहे. प्रभास प्रवेश करतो )

**प्रभास**—काय हें बार आहे, कीं बालाजीचं मंदीर आहे ? कां बंद केला होता दरवाजा ? प्राण चाललाय आमचा अन् दार बंद करून कसलीं खलबतं चाललीं होतीं ? बोल—हंसतोस काय ? बोल—कां बंद केलं दार ?

**मालक**—( हंसत ) माफ करा हं—मी तरी काय करूं ? माणसाना आत बसायला पुरेशी जागा तरी पाहिजे ना ? मुंगीचा रिघाव होणंसुद्धा कठीण होऊन बसलंय् !—मी तरी काय करूं ? मला काय पैसा नकोय् ! हा कमाईचा दिवस !—( सुस्कारा ) शेवटचा दिवस !—हं !—शेवटचा दिवस !—ठीक—तुम्हीं आहांत—आम्हीं आहों—सरकार आहे नि ' ती ' पण आहे. कोंबडं झाकलं म्हणून तांबडं फुटायचं कांहीं राहात नाहीं म्हणावं—काय पाहिजे ?

**प्रभास**—काय पाहिजे ! काय मागतो इथं येणारा ? इथं येणारा काय फुलं तुळशीपत्र मागायला येत असतो—

**मालक**—तें खरं—पण कोणती ?

**प्रभास**—कोणती ? ( हंसतो ) कसली विचक्षणा करायची आज ? आज मिळेल ती—मिळेल तेवढी—मिळेल तेव्हां—

**मालक**—नाहीं—बारापूर्वी ! ठीक—काय आणूं ?

**प्रभास**—वाटेल तें आण—समजलास ? वाटेल तें—नाहीं तर सगळ्या जाती ओत एका पिंपांत—तोटीला लाव एक रबरी नळी नि दे ती माझ्याकडे—मरेपर्यंत पीतों पहा ! ( मालक बेल वाजवतो. वेटर येतो—तो त्याच्या कानांत सांगतो ) कान चावूं नकोस—,ऐकलंस ?—कानाकानी नको—उघड उघड सांग—फसवायचंय् वाटतं मला—मी झिंगलेला नाहीं—फसायचा नाहीं—समजलास ? सकाळपासून पीतोंय् पण चढली नाहीं. नाहींच चढायची ! कंठाशीं प्राण आलेले नि म्हणे दारू चढतेय् !—मोठ्यानं बोल—(वेटर जातो)

**मालक**—इकडे आंत या—

**प्रभास**—आंत ? नाहीं ! इथं—इथं आण. त्या दारुड्यांत बसूं ! हंः ! दारुड्यांत बसवतोय् मला ! पहा—वास घेऊन पहा—पण शब्द अडतोय् का माझा ? मी त्या दारुड्यांत बसूं ? घड्याळाकडे काय पाहातोस ?—बंद कर तें घड्याळ—बंद कर म्हणतों ना ! हंसतोस काय ? बंद कर तें घड्याळ ! दारू नाहींशी करणार म्हणे ! पुसीफूट जॉन्सन्चे अवतार जसे कांहीं ! काय झालं अमेरिकेंत ? किती दिवस टिकली दारुबंदी ? अन् हे शहाण्याचे कांदे आतां अमेरिकेच्या नाकावर टिच्चून दारुबंदी करणार आहेत ! ( हंसतो ) आण—आण—किती वेळ लावतोयस—प्राण कासाविस होतायत् माझे ! तूं प्यायला होतास कधीं ? नाहीं ? अन् तूं दारु दुकान—चालवतोयस ! (हंसतो)

ठीक—ठीक—तूंच पिऊं लागलास तर आम्हांला काय राहाणार म्हणा !— नाहीं पीत तेंच बरं आहे ! किती वेळ ?—किती वेळ !—( त्याची गर्दन पकडून ) काहीं दया माया आहे तुला ?

**मालक**—आलाच तो—तो तरी काय करील बिचारा ? पंधरा माणसं नवीं ठेवलींत आज—पण श्वास घ्यायला उसंत नाहीं कुणाला ?

**प्रभास**—श्वास बंद करा नि पाजा म्हणावं ! श्वास घेतायत गधडे—आमचा प्राण चाललाय् नि हे श्वास घेतायत ! चल—जलदी कर. ( स्वतः बेल वाजवतो—) चल—चल जलदी—( वेटर येतो )

**वेटर**—हीच ना ? ( ग्लास देतो—सोडा ओतूं लागतो )

**प्रभास**—थांब—सोडा नको—कोरडी, अगदीं कोरडी—जाळित गेली पाहिजे आंत—पाणी घातलंस तर चेढल ! समजलास ? पाणी वाईट—सोडा वाईट—चढतं तें पाणी, दारू नव्हे ! ( पीत पीत ) तुला माहीत नाहीं हें शास्त्र !—( सुस्कारा ) संपलं सारं शास्त्र—आज पासून कांहीं मिळणार नाहीं—आकाशगंगेकडे पाहात राहावं लागणार !—मरावसं वाटतंय—पीत पीत मरावं !—आण—आणखी आण ! ( वेटर बाटली ओतूं लागतो—मालक त्याला डोळा घालतो )

**आवाज**—( उजव्या बाजूनं बाहेरून ) थांब—

( दोघे दचकतात—मालक हंसत दाराकडे जातो— )

**मालक**—या—या—अजून बरींच मिनिटं आहेत—( वेटर ओततो ) प्रभास पिऊं लागतो )

**आवाज**—( बाहेरून ) थांब—ठेव तो पेला खालीं !

**प्रभास**—ही आली देवयानी !—

**पिरोज**—( आंत येत ) होय !—देवयानीच !—तो भाऊ मानीव होता—हा सक्खा भाऊ आहे ! दादा, काय चाललंय् हें ?

**प्रभास**—दिसत नाहीं ? दारू चाललीय्—घशाखालीं चाललीय् !

**पिरोज**—ठेव तो पेला खालीं ?—लाज नाहीं वाटत ? कुणाचा मुलगा तूं !' काय करतोयूस हें ?

**प्रभास**—सूड उगवतोंय बापाचा ! समजलीस—माहित नव्हतं त्यांना, की त्यांचाच मुलगा असा दारुडा आहे ! म्हणूनच ना केले हे उपद्याप त्यांनीं ? पहा—एकदां पिऊन पहा—पुनः संधि यायची नाहीं अशी ! तूं पी नि

बाबांना म्हणावं, तुम्हीही पिऊन पहा नि मग करा म्हणावं दारूबंदी ! ऐक-ऐक कसा धुमाकूळ चाललाय आंत ! मी करतोंय् का तसा आरडाओरडा— पहा, कसा मुकाट्यानं पीतोंय् ! संततधार धरलीय् सकाळपासून ! थोडी पी ना पिरोज !—खरंच, विसरलों. ( मालकास ) ही माझी बहिण, पिरोज. ( मालक मान वांकवतो ) दारुबंदी पोलिसांची म्होरकी—( हंसतो ) या बायका करणार आहेत पोलिसगिरी !—बायका !—हं हं हंः ! बायका ! पोरी !— काल परकर फेकून आज साडी गुंडाळलेल्या पोरी म्हण पोलिसकी करणार !—

**पिरोज**—दादा !

**प्रभास**—पोरी करणार पोलिसकी ! दारूबंदी करणार ? कधीं बंद झालीय् दारू ? उद्यां सूर्याला उगवूं नको म्हणतील !—

**पिरोज**—दादा !

**प्रभास**—चूप राहा !

**पिरोज**—मणि येतेय्—

**प्रभास**—मणि येतेय् ?—कुठं ? इथं ?

**पिरोज**—पोलिस म्हणून !

**प्रभास**—मणि पोलिस झाली अं ? ऐकलंत मालक, मणि पोलिस झाली ! काय चमत्कार आहे—मणि पोलिस झाली ! पिरोज पोलिस झाली ! नि आम्हीं काय करतों आहोंत ?—दारू पितों आहोंत !—काय करणार ? न पिऊन काय करणार ! किती मिनिटं राहिलीं ?—

**पिरोज**—ठेव तो पेला खालीं !

**प्रभास**—पांच मिनिटांनीं मरण ओढवणार नि ही माझ्या तोंडीं गंगोदक सुद्धां जाऊं देत नाहीं ! बायका निर्दय म्हणतात तें खोटं नाहीं ! अनृतं साहसं माया मुर्खत्वं अतिलोभता, अशौचत्वं निर्दयत्वं—

**पिरोज**—गप्प बैस !—

**प्रभास**—संस्कृत आहे हें ! बंदी आहे ती दारूला—संस्कृताला नाहीं. दारू बंद करा—आम्ही सोमपान करूं—यज्ञ करूं—यज्ञदेवतांना सोमपानाचा हविर्भाग देऊन आम्हीं यज्ञदेवतेचा प्रसाद सेवन करूं !—मणि पोलिस झाली अं !—वेटर, और लाव—जलदी लाव—मणि यायच्या पूर्वी—जलदी— जलदी—मणि पोलिस झाली अं !

**पिरोज**—दादा, मणि पोलिस झाली हें तुझ्या जिवाला डाचतं—नि तूं हा दारुड्या झालास हें मणिनं पाहिलं तर !—आजवर तुझं गुपित झांकून ठेवलं—

**प्रभास**—कां झांकून ठेवलंस ? आधींच कां सांगितलं नाहींस तिला ? का सांगितलं नाहींस, बोल ?

**पिरोज**—स्वतः तूं कां नाहीं सांगितलंस ?

**प्रभास**—मी स्वतः कां नाहीं सांगितलं ! शरम वाटली मला !—ऐकलंस ? मला शरम वाटली. मी दारुड्या झालोंय् पण बेशरम झालों नाहीं, म्हणून नाहीं सांगितलं तिला. तूं सांग—आतां सांग—ही शेवटची घटका आहे—आतां सांग—बोलाव तिला इथं नि सांग, कि प्रभास अट्टल दारुड्या आहे—

**पिरोज**—आजपर्यंत होता—आज दारुबंदी होणार—

**प्रभास**—तरीही प्रभास दारू पीणार ! बापानं केलेल्या दारुबंदीच्या कायद्याला बगलेंत मारून दारू पीणार ! समजलीस !—मणि बंदीपोलीस झाली अं ! ऐकलंत मालक, या पोरी वेड्या आहेत. आजवर आम्हीं या पोरींना कोंडून ठेवलं होतं घरांत. १९३० सालीं त्या म्हाताऱ्यानं यांना बाहेरची दिशा दाखवली, तेव्हांपासून कानांत वारं शिरलेल्या वासरासारख्या या उधळल्या आहेत. पोरी पोलिस होऊं लागल्या अं !

**पिरोज**—दादा, घड्याळाकडे पहा !—

**प्रभास**—तें काम तुम्हा लोकांचं आहे. पाहायला मान वळवली तर तेवढाच क्षण फुकट जाईल ना माझा ! तूं पहा, अन् एकदोन मिनिटं राहिलीं कीं मला सेकंड सांगूं लाग !

**पिरोज**—बाबा येतील आतां—

**प्रभास**—ऐकलंस—सेकंड सांगूं लाग !—

**पिरोज**—स्वयंसेवकाच्या पोपाखांत तूं दारू पितोयस हे जर त्यांनीं पाहिलं—

**प्रभास**—मालक, दारावर नजर ठेवा—

**मालक**—जी !—

**प्रभास**—नीट नजर ठेवा. अन् इथं एक कुणी माणूस राहूं दे. चट्कन् हीं भांडीं उचललीं पाहिजेत त्यानं !—( पिऊं लागतो )

**पिरोज**—आतां पुरेच केलंस तर ?

**प्रभास**—( हंसतो ) वेडी आहेस ! ( पितो )

**पिरोज**—बाबांचं मला कांहीं वाटत नाहीं—पण दादा, मणि आली तर !—

( प्रभास तिच्याकडे पाहात प्यायचें थांबवतो ) बाबांना फसवशील ! हो, मीसुद्धां पांघरूण घालीन तुझ्यावर—पण मणि ? तिला नाहीं फसवणार !—आतां तर मुळींच नाहीं फसवणार ! समजलास ! सरळ सांगेन—

**प्रभास**—वेटर—वेटर—( वेटर येतो ) उठाव—उठाव—जलदी उठाव ! वेळ भरत आली. पाहिलंस घड्याळाकडे ? आंतल्या माणसांना आवर. पुरे झालं म्हणावं आतां ! ( वेटर जातो. आंत गलगा वाढतो ) ये म्हणावं आतां मणिला. ( खिशांतून कागदांत गुंडाळलेली पट्टी घेऊन खातो ) खूप मसाला घातला आहे—नि थंडकसुद्धां !—( हंसतो ) ( मालकाला ) पट्टी छान रंगलीय् नाहीं ?—मणि येणार आहे नाहीं ?—केव्हां ? कीं उगीच मला तंबी देतेयस ?—

**पिरोज**—यापूर्वीच आली असती ती—पण मला कल्पना होती—मीच पाठवली तिला दुसरीकडे !—( बाहेर जयघोष )—कोण •आलं ? ( मालक व पिरोज बाहेरच्या आणि प्रभास आंतल्या दाराकडे जातात ) कोण ?— ( दोन तीन दारुडे येतात )

**एक**—( खिशांतील बाटली तोंडाला लावून ) दारूबंदीकी जय ! दारू पीना हराम है ! ( पीतो )

**दोघे**—दारू पीना हराम है—( त्याच्या हातची बाटली घेऊन पीतात )

**एक**—लाव—और लाव—गलास नको—आक्खी बाटली !—पाहातां काय ?—लुटा—घाला दरोडा—खूप मिळवले आहेत पैसे लेकाच्यानं आजवर !—( दाराकडे जाऊन ) या—या—इथं मुक्तद्वार आहे—पाणपोयी आहे—( घोळका येतो ) पाहातां काय ? घाला दरोडा—लुटा—दसऱ्याला सोनं लुटतात तसं लुटा ! विजयादशमी आहे आज—विजय दिवाणांचा नि दारू आमची !

**प्रभास**—खामोष !—काय चालवलंयुत हें ?

**एक**—हंः—तूं ? काय रे, हाच पीत होता ना मघाशीं आमच्याबरोबर ?—पाहातां काय ? लुटा, लुटा—बिल-बिल कुछ नहिं ! समझा—मालिकसाब !—बिल आतां जहान्नुममधें !—चलो हमारे साथ ! ( गातो—चलो हमारे साथ साजन—)

( सारे आंत घुसतात )

**पिरोज**—पाहिलंस ? कसं दिसतंय् हें चित्र ?

**प्रभास**—अशिक्षित आहेत !—

**पिरोज**—आणि सुशिक्षित ?

**प्रभास**—ते पद्धतशीर कामं करतात. अशी हुल्लड करीत नाहींत ‘ बिल देणार नाहीं ’ असं तोंडानं म्हणणार नाहींत ! मुकाट्यानं निघून जातील ! काय मालक ? पाहात काय राह्यलांत ?

**मालक**—काय करायचं ? ( आंत गलगा वाढतो ) ऐकलंत ? काय नशिबीं असेल तें होईल ! पाणीच सोडलंय् सर्वस्वावर, तिथं आतां शेंपन्नास बाटल्यांची कसली खंत करायची !

**प्रभास**—याला म्हणतात स्थितप्रज्ञ ! अशीं स्वार्थत्यागी माणसं पाहिजेत !—

**पिरोज**—दादा ! ! !

**प्रभास**—कार्याला यश आणतात तीं असलीं माणसं ! ते एक हुल्लडवाले, तुम्हींही त्यांतलेच ! एकाची प्यायची हुल्लड—एकाची बंदीची हुल्लड ! दोन्हीही हुल्लडीच ! हुल्लडीनं कामं होत नाहींत ! डोकं थंड पाहिजे—स्थित-प्रज्ञत्व पाहिजे—असं—या मालकांसारखं ! समजलीस ?—मणि नाहींच आली शेवटीं !

**पिरोज**—येईल.

**प्रभास**—केव्हां ?—उगीच घाई केलीस. आणखी दोन घोट गेले असते !—मालक, वेटरला हांक मारा—

**पिरोज**—थांब—ऐक—( बाहेर जयघोष ऐकूं येतो ) पहा—पहा, कोण येतंय् पहा !—

**मालक**—दारूचा काळ !

**पिरोज**—होय—दारूचा काळ ? भारतभूमीचा रक्षणकर्ता—( दिवाण येतो ) बाबा !—

**दिवाण**—कॅप्टन पिरोज,—( पिरोज सॅल्यूट देते—प्रभासही तसेंच करतो ) वेळ भरत आली ! ( मालकाला ) तयारी आहे ? दुकान खालीं झालं पाहिजे. सरकारी माणसांना एवढासुद्धां अडथळा होतां कामा नये. आधीं तयारी ठेवा—बाराच्या ठोक्याला दुकान खालीं झालं पाहिजे—समजलं ?—समजलं कॅप्टन ?—

**पिरोज व प्रभास**—जी !—

**दिवाण**—कुणाला एवढासुद्धां त्रास होतां कामा नये. हाणामारीची जरुरी नाहीं—

अगदीं मुकाट्यानं—अगदीं शांतपणानं !—कुणी बाटल्या लपवूं लागला तर काढून घ्या—पण दांडगाई नको—हें काम बायकांचं, पुरुषांचं नव्हे. पुरुष बंदोबस्त करूं लागले, कीं दांडगाई झालीच, समजलं कॅप्टन पिरोज ?

**पेरोज**—जी !

**दिवाण**—ठीक. ( इकडे तिकडे पाहातो. हातांतील घड्याळाकडे व दुकानांतील घड्याळाकडे पाहात ) एक मिनिट मागं आहे घड्याळ. केवढे अनर्थ होतील एक मिनिटांत ? ( प्रभास धावत जाऊन एक मिनीट घड्याळ पुढें करतो ) ठीक. समजलं कॅप्टन, अगदीं शांतपणें—शांतपणें—आईच्या भाषेनं बोलायचं. आईच्या भाषेनं समजूत घालायची—आईच्या हातानं बाटल्या काढून घ्यायच्या—( मालकाला ) तयार राहा.—ठीक ! (इकडे तिकडे पाहून जातो.)

**मालक**—( सुस्कारा ) सुटलों !

**पिरोज**—नाहीं. सांपडायला सुरवात झाली.

**प्रभास**—वेटर !—

**पिरोज**—नाहीं.

**प्रभास**—वेटर—( वेटर येतो ) चल आण. ( वेटर जातो )

**पिरोज**—दादा—

**प्रभास**—नाहीं—तुझ्या बापालासुद्धां ऐकणार नाहीं आतां—एवढा एक क्षण—जन्माची भरपाई करून घेतली पाहिजे. ( मालक हंसतो ) हंसतोस ? कां ?

**मालक**—अमेरिकेची आठवण झाली मला.

**प्रभास**—मलाही आठवतेय अमेरिका—पण किती वर्षं वाट पाहायची ? पुनः हंसतोस ? कां ?

**मालक**—वेडा म्हणून. वेड लागायची संधी हीच. डोकं शाबूत ठेवूं पाहातोंय—म्हणून हंसतोंय !

**प्रभास**—ठीक—( वेटर येतो ) आण—ओत—( मणि व स्वयंसेविका येतात—दचकतो ) फोड ती बाटली—फोड एकदम—( वेटर थांबतो )

**मणि**—सारी आलबेल !

**पिरोज**—साऱ्या तुकड्या वांटून दिल्या ? प्रत्येक दुकानांत ?—ठीक.

**प्रभास**—ठीक !—बाटली फोड. पहातोस काय ?

**वेटर**—फोडलेलीच आहे.

**प्रभास**—तशी नव्हे—फोड—तुकडे कर—बारीक-बारीक—अशी—

( त्याच्या हातची बाटली घेऊन फोडतो ) हा मुहूर्त झाला !

**मालक**—अजून वेळ आहे—

**प्रभास**—मला नाहीं आता वेळ—

**पिरोज**—नाहीं—हें बेकायदेशीर कृत्य झालं. मणि, घेऊन जा या गुन्हेगाराला.

**मणि**—जी—( प्रभासला ) चला.

( प्रभास पाहात राहातो )

**पिरोज**—घेऊन जा—पाहाता काय ?

**मणि**—जी. ( प्रभास पुढें व सर्व स्वयंसेविका मागून जातात )

**मालक**—तुम्हीं इथंच राहाणार कॅप्टन ?

**पिरोज**—हुकूमच आहे तसा.

**मालक**—अस्सं ? जीव कसा डोळ्यांत आला आहे. इतक्या वर्षांचा पिढीजाद धंदा—आजपासून बंद होणार ! जन्मभर दारुड पाहात आलों कीं नाहीं, त्यामुळं सारं जगच दारूबाज आहेसं वाटत असं मला. पण आतां कळलं—दारू बंद होऊन देखील माणसं जगणार !—हंः ! मला वाटत होतं खाणावळ नि बार सारखंच. तिथं जसं खायचं, तसं इथं प्यायचं. खाणावळी कधी बंद होतील का ? तसंच हे वाटलं, इथं चुकलं !—घटका भरत आली—किती मिनिटं ?—एक मिनिट घड्याळ मागं राहिलं म्हणं—काय होत होतं एका मिनिटांत ?

**पिरोज**—किती बाटल्या खालीं होतील एका मिनिटांत !

**मालक**—तेही खरं आहे—भोग आला आहे खरा—आतां दुसरा धंदा पाहिला पाहिजे. ( एक क्षण स्तब्ध ) बोलत का नाही तुम्ही ?

**पिरोज**—काय बोलूं ? मी ड्यूटीवर आहे.

**मालक**—पाहावत नाही म्हणून इथं राहलों आहे. ( आत दंगा वाढतो ) काय दंगा चाललाय ! ( सुस्कारा ) आणखी एका क्षणांत शुकशुकाट होईल—कायमचा शुकशुकाट !—मसणवट होईल या जागत्या दुकानाची !—हं ! जगाचं कल्याण तर होईल ! जगाच्या कल्याणासाठी असा एकाददुसरा मेला म्हणून काय झालं ? लढाइत नाहीत माणसं मरत ? तसंच म्हणायचं नि स्वस्थ राहायचं!

**पिरोज**—तिकडं पहा—

**मालक**—चारच मिनिटं अं ! ( आंत गलका ) वेटर ! वेटर ! ( वेटर येतो ) घड्याळाकडे पाहिलंस ? आवरतं घे आतां. बाहेर काढ एकेकाला. बाटल्या

घेऊन जातील कुणी—चांगलं लक्षांत ठेव. (वेटर जातो) जीव कसा डोळ्यांत आला आहे—मृत्यू जवळ आल्यासारखं वाटतंय् (चार पांच वेटर एकएक झिंगलेल्या माणसाला धरून बाहेर आणून दरवाजाबाहेर लोटतात. कित्येक 'दारू पीना हराम है!' म्हणून ओरडतात. 'मदिराक्षसांचा नाश करा' म्हणून बाहेर होत असणाऱ्या पुकाऱ्याला जोड देत आहेत. कुणाच्या खिशांत बाटली सांपडल्यास ती मालक व पिरोज काढून घेत आहेत. बाहेर सामुदायिक गीत गात स्वयंसेवक जात असल्याचें ऐकूं येत आहे.)

**मालक**—झालं? गेले सारे? पहा—नीट पहा—चुकवून राहिला असेल कुणी छपून! —(वेटर जातो) परमेश्वरा, काय प्रसंग आणलास हा! जन्माची भाकर गेली—

**पिरोज**—एकाची भाकर गेली पण हजारांना अन्न मिळेल आतां. लाखांसाठीं एक गेला तर काय बिघडलं?

**मालक**—खरं आहे—खरं आहे. कसा विसर पडतो मला! घरादाराला आग लागल्यासारखं वाटतं आहे—(वेटर एका माणसाला उचलून घेऊन येतात) मला वाटलंच—अजून पहा—अजून कुणी असेल.

**वेटर**—नाहीं. अगदी कोनान् कोपरा धुंडाळून पाहिला. हा बेटा लपला होता टेबलाखालीं.

**मालक**—कपाटं झालीं खालीं?

**पिरोज**—पहा—तिकडे पहा—(घड्याळाचे ठोके पडूं लागतात. बाहेर आगगाडीच्या शिट्या, बोटी गिरण्यांचे भोंगे, घंटा, मोटार हॉर्न्स एकदम वाजूं लागतात)

**मालक**—झालं संपलं! (मटकन् खालीं बसतो. डोकं धरून क्षणभर मान खालीं घालून स्वस्थ राहातो) संपलं एकोणीसशें एकुणचाळीस साल. आतां चाळीस उजाडलं—भर मध्याह्नरात्रीं चाळिस उजाडलं—

**पिरोज**—(शिटी फुंकते. पुरुष व स्त्री स्वयंसेवक येतात) तुम्हीं जा ग!—तुमचं काम नाहीं इथं. (स्त्रिया जातात) हं—हीं कपाटं बाहेर घ्या. भरल्या रिकाम्या कांहीं पाहायचं नाहीं. बाहेर फेकून द्या—नाश करा. आंत अगदी कोनान् कोपरा धुंडाळा. (स्वयंसेवक कामाला लागतात) खरोखरच मला दुःख होतंय. हिंदुस्तानचा पैसा खर्ची पडलाय् या मालापायीं—

**मालक**—माझा पैसा—पैनूपै गेलीय् माझी—

**पिरोज**—हिंदुस्थानची! पण त्याला इलाज नाहीं. पैसा दिलाय् म्हणून कांहीं कुणी विषाचा पेला घशाखालीं ओतीत नाहीं. आतां काय करणार तुम्हीं? हें

दुकान खालीं करणार ? ( तो मानेनें होय म्हणतो ) केव्हां ?

**मालक**—इतक्यांतच नाहीं—भाडं भरलं आहे पुढल्या तीन महिन्यांचं. तेव्हां हें स्वप्न कुठं पडलं होतं ?—

**पिरोज**—आतां टाळं लावा दुकानाला. पाटी काढून टाका पुढली—समजलं ?

( स्वयंसेवक पेट्या कपाटें बाहेर घेऊन जातात )

**१ स्वयंसेवक**—खलास !

**पिरोज**—आतां कांहीं नाहीं.

**१ स्व०**—काहीं नाहीं.

**पिरोज**—चला—मार्च—

( सर्व जातात )

**मालक**—सारं नेलं ?

**वेटर**—हो—( हंसतो ) दिसत होतं तेवढं सारं नेलं.

**मालक**—चूप—हळू बोल—ती बया राहिली असेल सुगाव्यावर. मोठी खाष्ट आहे पोरटी—बापाचीच मुलगी कीं नाहीं ! तो पोऱ्या मात्र लाख माणूस !

**वेटर**—लाख माणूस ! हळूच शंभराची नोट देऊन गेला खिडकींतून !

**मालक**—अस्सं ! छान ! किती झाले आज ?

**वेटर**—शंभरपट झाली. आतां फोडा म्हणावं बाटल्या वाटेल तितक्या !

( बाहेर बाटल्या फोडण्याचे आवाज ऐकू येतात. जयजयकार होतो. खिडकींतून बाहेर आग पेटलेली दिसते )

**मालक**—ही कसली आग ?

**वेटर**—( पाहून ) मदिरा देवीचा पुतळा जाळताहेत दारूच्या बाटल्या ओतून—

**मालक**—जाळा म्हणावं पुतळे ! पुतळे जळाले तरी दारू जळायची नाहीं म्हणावं—मालव दिवे, चल !

( वेटर दिवे मालवतो. दोन मिजिटें Black out, पुनः उजेड होतो तेव्हां सर्व सामान गेलेलें आहे. दोन तीन खुर्च्या आणि भिंतींवर मध्यभागीं एक आरसा आहे. उजेड होतो तेव्हां तिथें कुणीच नसतें. एक क्षणानें वेटर येतो, इकडे तिकडे पाहातो आणि दुसऱ्या दारानें जातो. मालक येतो. )

**मालक**—( घंटा वाजवतो आणि बाहेरचें दार लावून घेत ) दार उघडं ठेवलं मूर्खानं ! ( वेटर येतो ) दार बंद करून घेतलं नाहींस ?

**वेटर**—चूक झाली. रोजच्या संवयीवर—

**मालक**—आतां रोजच्या साऱ्या संवयी सोडून दे. दरवाजाच दुसरा केला पाहिजे. कुलूप लावून टाकलं पाहिजे बाहेरून. बंद झालंय् ना हें बार ?

**वेटर**—जी.

**मालक**—इथं कुण्णी येत नाहींत आतां. येणार कसा कोण ? काय आहे आतां इथं ? असं आहे हें ! चहाच्या दुकानांतून आतां गर्दी होऊं लागली ! हंः चहाच्या दुकानांत ! चहा पिऊन का कधीं दारूची तलफ भागते ? दूध पाजताहेत म्हणे ! दारूडया म्हणजे जसा काहीं पाळण्यांतलं पोरच ! !

**वेटर**—पण आज जाताहेत ना सारे तिकडेच ?

**मालक**—किती दिवस ? अं ? किती दिवस ? पाहाशील—पाहाशील. कुणी नाहीं राहायचा दारू प्यायलाशिवाय ! दारू कधीं सुटली आहे ? ( दारावर टिचक्या वाजतात ) कोण ? पहा, खुणेची टिचकी दिसते. ( वेटर जातो आणि प्रभासला घेऊन येतो ) यावं—बसावं. बसून काय करायचंय् म्हणा. सिगारेटी ओढायच्या चार दोन—

**प्रभास**—हंः ! कुणाला सांगतां हें ? मला ? पिरोजला फसवा, बाबांना फसवा—अबकारी दिवाणांना ! पण या प्रभासला ?—

**मालक**—तें खरं आहे—पण तो डावच हुकला ! मोठी खाष्ट आहे ती तुमची बहीण—अचुक जागा ओळखून काढली नि फोडल्यान् साऱ्या बाटल्या—हजारांची कमाई गेली माझी काल—डोळ्यासमोर बाटल्या फोडित होते आणि नुसतं पाहात बसावं लागलं होतं.

**प्रभास**—असं का ? अन् मला हें खरं वाटणार ? पिरोज खटयाळ आहे हें मलाही कबूल आहे—शेवटच्या घटकेला काल .कशी माझी उचलबांगडी केली तिनं—-आपणच जामिन राहिली नि माझ्याकडून माफी मागायली लावलीन्. पण मालकसाहेब, अशानं माझं समाधान व्हायचं नाहीं. इतके ढिले नाहीं आपण ? प्रश्न काय तो पैशाचाच ना ? कुणी घेतली होती माघार पैसे द्यायला. ( पाकिट काढून ) हे घ्या, वाटेल तितके घ्या नि बाकीचे परत द्या. पाहातां काय ? संशय अं ! संशय कां ? मी माझ्या बापाचा मुलगा म्हणूनच ना ? वेडया माणसा, दारूबाजाला आईबाप असतात होय ?—

**वेटर**—खरं आहे !

**प्रभास**—पहा. या वेटरला कळतं ! कां ? बारमास दारूबाजांतच वावरतो कीं नाहीं हा ! काउंटरवर बसून माणसाची परीक्षा होत नसते. खरीं खोटीं नाणीं

पारखतां आलीं म्हणून माणसांची पारख नाहीं होत. चल—प्राण कंठाशीं आलाय् माझा. जीभ कशी कोरडी पडलीय् !—आजच्या हिंदुस्थानासारखी ! ( वेटरच्या गळ्यांत हात टाकीत ) चल, बेटा, चल. तुला माणुसकी कळते—हा बेटा नुसते पैसे ओळखतो. बैस म्हणावं पैसे घेऊन !—( सारे स्तब्ध. मालक कांहीं नोटा घेतो–बाकीच्या पाकिटांत घालून तें परत प्रभासला देतो नि वेटरला खूण करतो )

**वेटर**—चला. ( वेटर दिवा मालवतो—दिवा लावून मालक येऊन खुर्चीवर बसतो तो एकटाच )

( मालक येरझाऱ्या घालतो—दार ठोठावलें जातें. तो उघडतो. )

**मालक**—यावं—यावं—

**मणि**—( प्रवेश करून ) आतां कुणी आलं इथं ?

**मालक**—कोण येणार आतां या मसणवटींत ?

**मणि**—खरं सांगतां ?

**मालक**—अगदीं ईश्वरसाक्ष !

**मणि**—नक्की बातमी लागलीय् मलॉं—कॅप्टनना सुद्धां वर्दी मिळाली. आतां येतील त्या ! ( चोंहोंकडे पाहाते )

**मालक**—पाहा ना. या, इकडे आंत पहा. या ना—कांहीं संकोच धरूं नका. ( दार उघडून दाखवून तो बाहेर राहातो )

**मणि**—( आंत जातांना ) दार उघडंच ठेवा–तसंच—( जाते )

( मालक आपल्याशींच हंसत सिगरेट काढून पेटवतो. )

**पिरोज**—( प्रवेश करून ) इथं कोण आलं होतं ?

**मालक**—होय,

**पिरोज**—होय ? कोण ?

**मालक**—मणिब्हेन.

**पिरोज**—मणि !—मणि नव्हे—कुणी पुरुष ?

**मालक**—होय.

**पिरोज**—कोण ?

**मालक**—मी स्वतः !

**पिरोज**—थट्टेची बात नव्हे. कोण आलं होतं इथं ? प्रभास आला होता ? ( मणि येते ) काय आहे ?

**मणि**—कुणीही नाहीं आंत.

**पिरोज**—असं कसं होईल ? प्रत्यक्ष पाहून सांगितलं मला. वेटर कुठं आहे ?

**मालक**—तो कशाला येतो आतां !

**मणि**—चिटपाखरूं सुद्धां नाहीं आंत. भयाण वाटलं आंत गेल्यावेळीं.

**पिरोज**—माझी खात्री होत नाहीं.

**मालक**—आतां हेंच चालायचं. कुणाचीच खात्री व्हायची नाहीं. ही अशी छळाला सुरवात होणार !

**मणि**—जन्मभर छळलंत बायाबापडयांना—

**मालक**—आम्हीं नव्हे—बेवडावाल्यांनीं !

**मणि**—श्रीमंतांना नसतात वाटतं बायका पोरं ! अन् नशा येतो तो काय बेवडयाचाच ? व्हिस्कीला नसतो वाटतं नशा ! माझी आई, कशी मेली माहीत आहे ? माझा बाप चांगला लक्षाधीश आहे. बेवडा नव्हता पीत तो—दारूच्या नशेंतच त्यानं माझ्या आईचा जीव घेतला—नि आतां ठाण्याला ठेवलं आहे त्याला—वेडयाच्या दवाखान्यांत !

**पिरोज**—हं—हं—मणि, स्वयंसेविकेनं इतकं बोलायचं नाहीं.

**मणि**—जी.

**पिरोज**—कुणी नाहीं इथं म्हणतां !

**मालक**—ईश्वरसाक्ष ! मसणवटींतल्या वेताळासारखा इथं जुन्या आठवणी आठवित बसलों आहें—कोण येतो आतां इकडे ? सद्दी संपली ना माझी ! केवढा गजबजाट असायचा इथं पण आतां—( प्रभास येतो ) कोण, प्रभास ?

**पिरोज**—दादा !

**मणि**—तुम्हीं !

**प्रभास**—अरे कांहीं वेड लागलंय् कीं काय तुम्हाला ! बाहेरून तुम्हीं दिसलांत म्हणून मी आंत आलों. या रिकाम्या मदिरामंदिरांत म्हटलं या कोण मदिराक्षी घुसल्या ?—नि पाहतों तर तुम्हीं.

**पिरोज**—माफ करा—

**मणि**—माफ करा—( दोघी मालकाला नमस्कार करतात )

**पिरोज**—चल दादा—

**प्रभास**—कुठं ?

**पिरोज**—डयुटीवर. आम्हांला मदत कर जरा. तें पान थूंक ना तोंडातलं.

( प्रभास दचकतो ) मणिला नाहीं आवडत पान खाणं. होय ना मणि ?
चला—( तिघेंही जातात )
( मालक घंटा वाजवतो—समोरचा आरसा हळूहळू ढें येतो आणि त्यामागून वेटर येतो. )

**मालक**—आणखी कोण येणार ?

**वेटर**—तिघे यायचे आहेत.

**मालक**—इथंच रहा तूं. मी आंत जातों.

( मालक आरशाच्या दरवाज्यानें आंत जात असतां पडदा पडतो )

# अंक दुसरा

[ दिवाणांचा दिवाणखाना. आधुनिक फर्निचर-मागल्या बाजूला आंतून जिना असलेला दिसत आहे. पडदा वर जातो तेव्हां कोणी नाहीं. नंतर वेटर येतो—बाजूच्या दरवाजांतून बाहेर डोकावून पाहातो—आंत कुणी तरी ग्रामोफोन वाजवतांना अर्धेंच रेकॉर्ड काढून टाकल्याचा भास होतो. डाव्या दरवाजानें पिरोज येते.]

**पिरोज**—बाबा नाहीं आले अजून ?

**वेटर**—मला वाटतं, नाहीं—पण कुणी सांगावं, कदाचित आलेही असतील. मी केव्हांचा इथं नव्हतों—

**पिरोज**—पुरे—जा—

(वेटर तिच्याकडे पाहातो व हळुच हंसत जातो तोंच दुसऱ्या दरवाजानें मणि येते)

**मणि**—पिरोज—

**पिरोज**—ये—आलीस ?—बाबा दिसले कुठं तुला ?

**मणि**—नाहीं. कां ?

**पिरोज**—असं झालं आहे हल्लीं. बाबा बाहेर गेले, कीं ते घरीं येइपर्यंत माझा जीव ठिकाणावर नसतो. अशी भीति लागून गेली आहे मनाला—

**मणि**—पण कां ?

**पिरोज**—( हंसून ) तुला कसं कळायचं ?—कसं सांगूं ?

**मणि**—मग नको सांगूं !

**पिरोज**—रागावूं नकोस ! माझ्या घरांत मीच चोर झालें आहें. कुणावर विश्वास टाकायचा ? खिडक्या दारांची सुद्धां भीति वाटते !—

**मणि**—अन् प्रभास ?

**पिरोज**—हो—प्रभास !—प्रभास आहे—पण तुला माहितच आहे—कोणतीही गोष्ट तो कधीं गंभीरपणानं पाहातो का ? तोंड उघडलं, कीं झाला त्याचा चावटपणा सुरू !—

**मणि**—नाहीं ग !—

**पिरोज**—चावटपणा म्हणजे तसा भलताच अर्थ नको घेऊं ! त्याचा स्वभावच आहे तसा. मानेवर सुरी ठेवली कुणी, तरी हंसत राहील.—रागानं म्हणतें मी

चावटपणा म्हणून, पण मलासुद्धां केव्हां केव्हां वाटतं, माणसाची वृत्ती असावी तर अशी !—पण मला तें काहीं साधत नाहीं.

**मणि**—मलाही साधत नाहीं—पण आवडतं मात्र.

**पिरोज**—बाबा नाहींच का आले ?

**मणि**—पहा ना !

**पिरोज**—पहायचीसुद्धां भीती वाटते. त्यांना नाहीं तें आवडत. माझा जीव राहात नाहीं म्हणून विचारतें—पण विचारलं तर रागें भरतात. तीन महिने झाले या दारूबंदीला—पण सगळीच कशी बंदी झाली आहे ! बोलण्याची सुद्धां बंदी ! वातावरण कसं भारून गेलं आहे—

**मणि**—आपली ड्यूटी आपल्याला बजावली पाहिजे. कामाचा भार आपल्यावर ज्यांनीं टाकला आहे त्याची मानहानि होतां कामा नये. इतर गोष्टींचा विचार करून कसं चालेल ?

**पिरोज**—कोण करतंय् इतर गोष्टींचा विचार. या एकाच विचारानं जीव कसा मेंगळून गेला आहे. जिकडे तिकडे संशय दिसतो—विश्वासघात दिसतो—बेइमानी दिसते. काय हा पैशाचा मोह ! ( वेटर येतो ) काय आहे ?

**वेटर**—साहेब नाहीं आलेले दिसत कुठं !

**पिरोज**—ठीक. जा. ( वेटर जातो ) केव्हां येणार कोण जाणे ! कुठं गेले आहेत ?

**मणि**—अशी घाबरतेस कां ? काय आहे एवढं घाबरण्याजोगं ?

**पिरोज**—तेंच कळत नाहीं मला नि म्हणूनच एवढी भीति वाटते. ( इकडे तिकडे पाहात हलक्या आवाजांत ) हीं नवीं माणसं आलीं आहेत घरांत ! कां आणलीं आहेत कोण जाणे ! बोलून चालून दारू दुकानदार, त्याला खासगी कारभारी करून ठेवला आहे. कसा छायेसारखा फिरत असतो बाबांबरोबर !—

**मणि**—त्याची भीती वाटते ?

**पिरोज**—नाहीं ग. पण मला तें कांहीं पटत नाहीं. दुसरीं नव्हतीं का कुणी माणसं ? ( दचकते ) कोण आलं ?

**मणि**—कुणि नाहीं. काय संशयी झाली आहेस ?

**पिरोज**—त्या वेटरची भीती वाटते मला ! कसा भुतासारखा वावरत असतो घरांतून. केव्हां कसा येतो अन् कुठं जातो—कळतसुद्धां नाहीं. कामं कशीं अगदीं यंत्रासारखीं करतो. एकदां सांगितलं, कीं पुनः कधीं कांहीं सांगावं लागत नाहीं. पण त्याच्याकडे नुसतं पाहिलं—

( वेटर येतो )

**वेटर**—मला हांक मारली ?

**मणि**—कुणी ? केव्हां ?

**वेटर**—( पिरोजला ) मला हांक मारली ?

**पिरोज**—नाहीं. ऐकलंस ? हें मला आवडत नाहीं. असलीं भलतीं खोटीं निमित्तं करून कानचावणी केलेली मला मुळींच पसंत नाहीं. समजलं ? जा. ( वेटर जातो ) पहा. कसा जीव कावून जाणार नाहीं ? जशी कांहीं पाळथ ठेवित असतो !

**मणि**—मग काढून कां नाहीं टाकित त्याला ?

**पिरोज**—कोण काढणार ? बाबा त्याच्यावर खूष आहेत—दादाचा तो एक शब्द सुद्धां खालीं पडूं देत नाहीं—तक्रार करायला मला तरी कुठं तो कारण देतो ?—पण—नाहीं—तुला तें कळायचं नाहीं.

**मणि**—फार चमत्कारिक झाला आहे तुझा स्वभाव ! दारूबंदी झाली म्हणून जग आनंदानं हंसतं आहे तिकडे, अन् तूं अशी ही उदासवाणी होतेस ! तुला अभिमान वाटायला हवा तुझ्या बाबांचा.

**पिरोज**—अभिमान वाटायचा जगाला—मला काळजी वाटते आहे त्यांची. सारं जग हंसतं आहे म्हणे ! दांतओठ खात बाबांना शिव्याशाप देणारा त्या जगांतला लहानसा तुकडा तुला दिसत नाहीं—पण माझ्या डोळ्यांसमोर तो जळजळतो आहे. ( मागें जिन्यावर पावलें वाजलेलीं ऐकतांच दचकते ) कोण ?

**मणि**—कोण ?

( जिन्यावरून दिवाण 'बॉय्' म्हणून हांक मारतो. वेटर 'जी' म्हणत डाव्या दारानें येतो. दिवाण उतरून खालीं येतो )

**दिवाण**—बॉय्, कारभारी कुठं आहेत ?

**वेटर**—मला माहित नाहीं साहेब.

**दिवाण**—पहा. ( मालक डाव्या दारानें येतो )

**मालक**—जी.

**दिवाण**—ठीक. कागद तयार झाले ?

**मालक**—होय साहेब.

**दिवाण**—इथंच आणा—( मालक जातो ) बॉय, कॉफी. ( वेटर 'जी' म्हणून जातो )

**पिरोज**—तुम्हीं बाहेर गेलां होतां ना बाबा ?—केव्हां आलांत ?—

**दिवाण**—तुझी ड्यूटी केव्हां आहे ? ( मणिला ) अन् तुझी ?

**पिरोज**—कामगिरी उरकूनच आलों आम्हीं.

**दिवाण**—रिपोर्ट दिला ?

**पिरोज**—जी.

**दिवाण**—ठीक.—तुला कॉफी हवी पिरू ?—अन् तुला ग ?

( पिरोज मणिला ' होय म्हण ' अशी खूण करते )

**दिवाण**—बॉय्—( वेटर येतो ) आणखी दोन कप. ( वेटर जातो ) ती फिल्म पाहिलीस डायमंड थिएटर मधली ! युद्धविरोधी कथा दिसते. पटत नाहीं कुणाला. लढाईच्या गोष्टी बोलायला मोठ्या छान वाचायला तर फारच मजेच्या—अनुभव काय असेल कोण जाणे ! वाटतं, इथं केव्हां तरी लढाई व्हावी नि दारूबंदीच्या देशांतले लढवय्ये कसे लढतात तें जगानं पहावं.

**पिरोज**—खरंच.

**दिवाण**—गेली लढाई अमेरिकनांनीं जिंकली तेव्हां ते दारुडे नव्हते. दारुडे नव्हते म्हणूनच अमेरिकनांनीं युरपची अब्रू राखली. दारुडा युरप नाशाच्या कांठावर उभा होता—( वेटर कॉफी घेऊन येतो व जातो ) सक्तीनं सुधारणा होत नाहीं म्हणे ! हंः—अमेरिकेनं करून दाखवलं—

**पिरोज**—पण टिकलं नाहीं.

**दिवाण**—सगळेच दारुडे आजूबाजूला वावरत होते. दारुडयांच्या कॉलनी होत्या ना जवळ ?—आमिष नजरेसमोर असतां नये—शेजारीं सुद्धां असतां नये. तो शेजार बांधला. बरं आहे आमचं, कीं आम्हांला असले शेजारी नाहींत. सारं हिंदुस्थान आतां कोरडं झालंय् ? संस्थानं सुद्धां कोरडीं झालीं आहेत !—म्हणून आशा वाटते.

**मणि**—तरी पण खबरदारी सुरू आहेच.

**पिरोज**—ती पाहिजेच. बीज आहे कुठं तरी—कुठला तरी पाऊस पडेल, अन् तें पुनः रुजेल.

**दिवाण**—ठीक. फिल्म पाहिलीस ती तूं ? ( मणिला पिरोज डोळा घालते ) नाहीं ? पाहून ये इकदां. तूंही जा ग. साखर पाहिजे ? नको ? कडू कॉफी मला फार आवडते. कडू कॉफी दिली पाहिजे त्या लोकांना. ज्यांना दिली त्यांची तलफ बरीच शमली—म्हणून आवडते मला कडू कॉफी—( हंसतो.

गंभीर होतो ) प्रभास कुठं गेला ?

**पिरोज**—मला माहित नाहीं.

**दिवाण**—( मणिला ) अन् तुला ? लाजूं नकोस. आई नसलेलं मूल आहे तें. तुलाही नाहीं कुणी. हिचा बाप तरी उभा आहे—पण त्याला विचाऱ्याला बाप असून नाहींसा झाला आहे. तुला कुणाचंच सौख्य नव्हतं—म्हणून आईबाप नसलेल्या पोराची कींव तुलाच येईल. हिला बाप आहे ! असा राग येतो हिचा ! आपला बाप जिवंत आहे हें शाबित करण्यासाठीं केवढा जिवाचा आटापेटा करीत असते ! प्रभास शहाणा आहे, तो नाहीं असल्या भानगडींत पडत.( हंसतो ) नजर ठेव त्याच्यावर. दुसरं कोण आहे त्याला ? ही बहीण त्याची—पण बापापुढं तिला भाऊ आठवत नाहीं. पुढं काय करणार आहे कोण जाणे !

**मणि**—मी जातें आतां घरीं.

**दिवाण**—कसली घाई आहे ? हे पहा मणि, मी सहज बोलत नाहीं—अगदीं बुद्धिपुरःसर तुला सांगतोंय्, प्रभासची काळजी घे. फार भीति वाटते मला त्याच्या भाग्याची. तूं या कामांत पडली आहेस—देशाच्या सेवेंत गुंतली आहेस—नाहींतर याचवेळीं तुम्हां दोघांचं लग्न लावून देऊन मोकळा झालों असतों. पण सेवेची माणसं प्रपंचाच्या मोहांत गुंतलीं राहाणं बरं नव्हे. चाऱ्ही वाटा मोकळ्या पाहिजेत त्यांना. तरी पण त्याच्यावर नजर ठेव—ही पिरोज माझ्यापेक्षां जर आपल्या कर्तव्याकडे जास्त नजर देईल—

**पिरोज**—कधीं ढिलाई झाली माझी ? कधीं चुकलें ? कधीं उशीर झाला ?

**दिवाण**—नाहीं. पण जास्त नजर देतेस माझ्याकडे. कसली काळजी वाटते तुला ?

**पिरोज**—कसली काळजी वाटते मला ! पुसिफूटचं चरित्र माझ्या नजरेसमोर आहे. वैऱ्यांचं जाळं आवतीभोंवतीं पसरलेलं—असे दबा धरून बसले आहेत एकेक—( दिवाण हंसतो ) तुम्हांला हंसूं येतं ! बेफिकिरी वाटते ! मी घाबरट का आहें ? माझ्या बापाची मुलगी आहें मी—पण मी भीतेंय् ती माझ्या बापासाठीं नव्हे—मी भीतेंय् हिंदुस्थानच्या भविष्याला. मी भीतेंय ती दारू-बंदीच्या ब्रीदावर घाला पडेल म्हणून. कोण दुसरा वाली आहे ? कसे टपून बसले आहेत एकेक—शत्रू नि मित्र—दोघेही कसे हंसायच्या तयारींत बस-लेयुत. त्यांची भीती वाटतेय् मला ! तीन महिन्यांत केवढी उलथापालथ झालीय् ! माझ्या बरोबर या--गरिबगुरिबांच्या घरीं या. तिथं पहा—तीन

महिन्यापूर्वी तिथं शिमगा होता, आज तिथं दिवाळी उजळली आहे. चेहेरेच बदललेयूत सर्वांचे. मला भीती वाटतेय् ती त्यांच्या दिवाळीची. ती दिवाळी बारमास गाजली पाहिजे—जगावर प्रकाश पडला पाहिजे तिचा !

**दिवाण**—ऐकलंस मणि ?—

**पिरोज**—थट्टेवारी नेऊं नका बाबा. ही थट्टेची वेळ नव्हे दिवाणसाहेब.

**दिवाण**—( कॉफीचा पेला लोटून उठतो ) वेडे पोरी, हिंदुस्थानच्या भवितव्याची काळजी घेणारीं किती तरी माणसं आहेत. तो भार तूं घेऊं नकोस आपल्या माथ्यावर, समजलीस ? ( एकदम मार्डीवर जातो—क्षणभर स्तब्धता )

**मणि**—पुरुषांची जात !

**पिरोज**—खरं आहे. प्रत्येक बलवानाला असंच वाटतं. मलासुद्धां असंच वाटतं. त्यांना कां दोष देऊं ? पण मन आहे ना—तें राहात नाहीं. अन् हे पाया-खालीं गाडलेले सुरुंग—नि हे असे दोघे मशाली हातीं घेऊन वावरताहेत—ही मह्लाची बेमुर्वत—खुलून दिसते, शंकाच नाहीं, केवढी तरी खुलून दिसते, पण हा खेळ सुखासमाधानानं खेळायला फार कठिण. तारेवरचा नाच दिसायला सुंदर—पण तारेवरून चालतो त्यालाच तें कळतं. रक्त गोठून जातंय् विचार करतां करतां—

( कठोर चेहेरा करून खालीं बसते. एक क्षण स्तब्धता )

**मणि**—जाऊं मी आतां ?—

**पिरोज**—जातेस ?

**मणि**—नको जाऊं ?

**पिरोज**—( तिच्या गळ्यांत हात टाकून ) असं कसं म्हणूं ? तुला तिथं कुणी नाहीं खरं पण तें तुझं घर आहे. इथं माझा बाप आहे—भाऊ आहे—पण मी मात्र एकटी आहे. तिथं तुला कुणी नाहीं पण इथं कुणितरी आहे म्हणून तूं तिथं एकटी नाहींस. मला इथं कोण आहे ?—सांग, ऐकलंस ना आतांच ? आतां सांग, मला कोण आहे ?

**मणि**—तुझं कर्तव्य—तुझं ध्येय ! तुझ्याकडे पाहूनच ना आम्हांला स्फूर्ति येते ? हातीं सोटा घेऊन बायका आज पोलिसकी करताहेत त्या तुझ्याच शब्दाच्या जोरावर ना ? गरिबाघरचीं बायकापोरं आज आनंदानें वागडताहेत तीं तुझ्याच तोंडाकडे पाहिल्यामुळं ना ? तुला कोण आहे म्हणतेस ? केवढा संसार आहे तुझा ! केवढा पसारा आहे !—केवढी दौलत आहे तुझी ! मला

तरी तुझा हेवा वाटतो.

**पिरोज**—माझ्या अंतःकरणांत डोकावलं असतंस तर तुला नसता हेवा वाटला. कुणाचा हा प्रपंच ? कुणाचा हा पसारा ? कुणासाठीं ? सांग ना, कुणासाठीं हा जिवाचा आटापेटा करतें आहें मीं ?—थांब—देशाचं कल्याण, देशाची सेवा—असले गोड गोंडस शब्द उच्चारूं नकोस. जगाच्या डोळ्यांत धूळ टाकणारांनीं खुशाल तीं गाणीं गावीं—मी खरं खरं सांगतें—एकच विचार माझ्या नजरेसमोर आहे—माझ्या बाबांचं यश ! देशाची काळजी त्यांनीं वाहावी—मी नुसती त्यांच्या काळजीची सेवेकरीण. देशाचा माझा काय संबंध ?—कुठं पाह्यलाय् मी हा देश ? कुणी पाह्यलाय् ? ढोंग—ढोंग—सारं ढोंग !—पण ह्या ढोंगांतून जर जगाचं कल्याण व्हायचं असेल !—अंतःकरणाच्या तळमळीचीं बाबांसारखीं माणसं किती आहेत ह्या देशांत ? कधीं मिरवलाय् अभिमान त्यांनीं ? म्हणून मी अशी भीतेंय्—म्हणूनच धडकी भरते मला—असल्या अस्सल देशसेवकाचं रक्षण केलं पाहिजे. जीव टाकला पाहिजे त्याच्यासाठीं. समजलीस ?—प्राण लावला पाहिजे पणाला !

[ पिरोज थकल्यासारखी स्तब्ध बसते. मणि तिच्या डोक्यावरून हात फिरवित असतां हळुहळु गाऊं लागते. मणि गात असतां शून्य नजरेनें पिरोज समोर पाहात असते—वेटर मध्येंच येऊन पेले घेऊन जातो. तो जात असतां मागल्या बाजूनें मालक हातीं कागद घेऊन येतो. वेटर हातानें जिना दाखवतो. एक क्षणभर एकमेकांच्या कानाशीं लागून वेटर आंत व मालक जिना चढून जातो. गाणं चालू असतं. प्रभास येऊन त्या दोघींच्या मागे उभा राहातो. पिरोज दचकून मागें पाहाते. गाणं थांबतें )

**पिरोज**—केव्हां आलास दादा ?

**प्रभास**—चालूं द्या—चालूं द्या तुमचीं गाणीं. जग मोठं खुषींत आलं आहे नाहीं मणि ? जिकडे तिकडे आनंद नुसता बागडतोय्. लोक नावं ठेवित होते बाबांना—आतां नव्हे—पूर्वी—दारूबंदीपूर्वी; पण आतां चोहीकडनं आशीर्वादांचा वर्षाव होतो आहे बाबांवर. गरिबाच्या घरांतून आतां पेजभाकरी रोज नांदूं लागली आहे. उपासमर चालली होती पूर्वी. रोज संध्याकाळीं गुत्त्यांत तुळशीपत्र वाहतांना घरचा संसार घंटानाद करित होता. आतां दूध पीताहेत, कॉफी पीताहेत—चैन करताहेत बेटे; तेव्हांच हें गाणं सुचतंय तुम्हा लोकांना. गिरणीच्या लत्त्यांतच वावरतां कीं नाहीं तुम्हीं !—

**पिरोज**—आतां जाशील दादा !

**प्रभास**—कां ? काय झालं ? काय बिघडलं ? काय चुकलं माझं ? सांग ना मणि—मी काय खोटं बोललों ? जग हंसतं आहे !—नाहीं जग हंसत ?—मग ही कां रागावली माझ्यावर !

**पिरोज**—जग हसतं आहे पण तूं हंसतोयुस का ?

**प्रभास**—वाः ! मी कधीं हंसलों नव्हतों ? सारखा हंसत राहतों मी, म्हणून तूंच ना माझी सारखी तारीफ करतेस ?

**पिरोज**—आतां पश्चात्ताप होतो मला.

**प्रभास**—कां ?

**पिरोज**—तुला एकदां रडलेला पाहावं असं आज वाटूं लागलंय् मला ! सारं जगच हसूं लागलं तर मग रडायचं कुणी ?

**प्रभास**—रडताहेत कीं कुणी कुणी ! ज्यांचीं दुकानं बंद झालीं, ज्यांचा धंदा बसलाय् ते रडतात की मधून मधून. आतां हा आपला कारभारी—हा नाहीं रडत. चट्कन नोकरी मिळाली बेटयाला. अन् ती कुठं ? खुद्द दिवाणांच्या घरीं. केवढा हेवा वाटतोय् इतरांना त्याचा. तो कशाला रडतो आतां ?—चैन चाललीय् बेटयाची—

**पिरोज**—म्हणूनच मला वाटतं—तो नाहीं रडत, एकदा तूं रड.

**मणि**—ही कसली अभद्र थट्टा ग ?

**प्रभास**—ही थट्टा नव्हे मणि. ही काय म्हणते तें मला पटतंय्. मलासुद्धां वाटतं केव्हां केव्हा, कीं रडावं म्हणून. आई मेली तेव्हां सुद्धां मला रडूं आलं नाहीं—बाबांच्या डोळ्याला त्यावेळीं टिपूस सुद्धां आलं नाहीं. त्यांचाच मुलगा ना मी ?—हिला विचार—

**पिरोज**—मरणासाठीं का रडायचं ?

**प्रभास**—खरं आहे. मेला कीं आटोपला बाजार. जगावं लागतं म्हणून रडावं लागतं. पण तुला ठाऊक नाहीं पिरोज, फार हंसतात तीं माणसं आंतून रडत असतात. सारखीं टिपं गाळित असतात हृदयावाटे !—( वेटर येतो ) काय आहे ?

**वेटर**—चहा आणूं कीं कॉफी आणूं ?

**प्रभास**—हें पहा, एक बोंडलंभर दूध आण माझ्यासाठीं. या पोरी फार काळजी घेतात माझी. ' चहा आणूं कीं कॉफी आणूं ' म्हणे ! जा—ऑरेंज ज्यूस

घेऊन ये. ( वेटर जातो ) केवढी काळजी आहे याला माझी !—नोकर असावा तर असा असावा !

**फिरोज**—खरं आहे.

**प्रभास**—अगदीं निर्धास्त झालोंय् मी याच्यामुळं. मला काय हवं हें माझ्यापेक्षां त्यालाच जास्त चांगलं कळतं ? बाबासुद्धां केवढी तारीफ करतात त्याची !—( वेटर ग्लास आणून देतो व जातो. तो पीत पीत बोलतो ) कसं काय तुझं काम चाललं आहे मणि ? बायकांना भिऊं लागले आहेत ना सारे लोक ? स्टेशनवर पाहिली तुला—अन् तो तुझा पोलिसचा तांडा—अबकारी साडीपलटण !—

**फिरोज**—दादा !

**प्रभास**—सारं जग म्हणतंय् मग मीच काय अपराध केलाय् ?—एवढी नाकेबंदी केलीय् तरी रोज एकाददुसरी बाटली मिळतेच—तिकडं गोवं आहे—दीव आहे—दमण आहे !—तिकडे पाँदिचरीला काय होत असल देव जाणे !—तरीही म्हणतात, कीं हिंदुस्थान कोरडं झालं ! साहेब आहेत नां इथं ? त्यांची नको सोय व्हायला ?—ते बिचारे बेवडा पीत नाहीत—राशी फेणी त्यांना माहित सुद्धां नाहीं—

**फिरोज**—आतां जाशील इथनं ?

**प्रभास**—ही माझी मायची बहीण ! पाहिलीस मणि ? ही माझी जिवाभावाची पाठीराखीण ! हिच्या जिवावर मी जगतोंय् !—( फिरोज जाते ) रागावली ! तूं हिशेबांत धरूं नकोस तिचा राग. हा लोभाचा रुसवा आहे. तिला खिजवून घालवली, कीं माझा जीव कसा शांत होतो. एवढंच सुख आहे मला. एव्हांपासून तुला ही सवय केली पाहिजे. लोभाच्या माणसाचा रुसवा पाहिल्याशिवाय माझं समाधान होत नाहीं. ( जिन्यावर पावलें ) बाबा आले वाटतं ?—

**मणि**—मी जातें आतां—

**प्रभास**—कां ? तूही रागावलीस ?—हें काय मणि ! रुसायला वेळ आहे अजून फार. एव्हांच तालीम घेऊं नकोस ही. बाबा येताहेत, यावेळीं कुणाचा तरी आधार पाहिजे मला. थांब.

**दिवाण**—( जिन्यावरून येत असतां मालकाला ) इनस्पेक्टर बदलला पाहिजे. एवढासुद्धां संशय वाया जाऊं देतां नये. गुन्हा शाबित होत नसेल तर साधी

नोटिस देऊन काढून टाका—पण संशयाला थारा नको. जा. ( मालक जातो ) आलास ? मला वाटलंच होतं —पिरोज कुठं आहे ?

**प्रभास**—( पीत पीत ) रागावली आहे ती माझ्यावर.

**दिवाण**—कां ?

**प्रभास**—थट्टा कळत नाहीं तिला—रुचत नाहीं. मीच चुकलों.

**दिवाण**—( बसतो ) कुणी माणूस आहे तुझ्या खात्रीचा ? इतक्यांत चौघांना बडतर्फ करावं लागलं. पैशाचा लोभ मोठा कठिण आहे—पैशाच्या लोभाला बळी पडणार नाहीं असा कुणी—

**मणि**—आहे.

**दिवाण**—कोण ?

**मणि**—एक विद्यार्थी—माझा मामेभाऊ.

**दिवाण**—खात्री आहे ? विश्वासू आहे ?

**मणि**—माझ्याइतकाच.

**दिवाण**—ठीक. आतांच आण त्याला. जा. ( मणि जाते )

**प्रभास**—कौन्सिलांत भडिमार होईल.

**दिवाण**—मी खंबीर आहें उत्तर द्यायला. जाहिराती देऊन विश्वासू माणसं मिळत नसतात. काम चोख झालं पाहिजे. कौन्सिलला काय, प्रश्न विचारणं सोपं असतं. माणसं मिळवणं फार कठीण आहे. मला माणसं पाहिजे आहेत—नेकीचीं माणसं मिळवतांना मला कुणी वशिलेबाज ठरवलं तर मी कुणाचीही पर्वा करणार नाहीं. जबाबदारीची जाणिव नसणाऱ्या माणसांच्या फुकट प्रश्नांना मी कवडीचीसुद्धां किंमत देणार नाहीं. ( पिरोज येते ) गेला राग ?

**पिरोज**—( प्रभासला ) काय सांगितलंस बाबांना ?

**दिवाण**—हें चालायचंच. कोण आहे दुसरं ? तुम्हीं दोघं अशीं भांडलांत तर कोण घालणार तुमची समजूत ?—तुमचं तुम्हीच मिटवलं पाहिजे—

**पिरोज**—पण भांडलं कोण ?

**प्रभास**—नाहीं रुसलीस तूं ?

**पिरोज**—मी लहान कां रे आहें आतां ?

**प्रभास**—कोण म्हणतो तूं लहान आहेस म्हणून ? पण रुसायला वय कुठं आड येतं ? मोठीं माणसं नाहीं रुसत ? बाबा सुद्धां रुसतात केव्हां केव्हां !

**दिवाण**—प्रभास !—

**प्रभास**—( पीत पीत ) कबूल नका करूं—पण रुसत कोण नाहीं ? मुलापासून म्हातान्यापर्यंत प्रत्येक जण रुसत असतो. केवढं सौख्य असतं रुसण्यांत ! केवढा आनंद असतो ! त्याच आनंदाच्या आधारावर संसार सुखाचा होत असतो—

**पिरोज**—संसार असेल तर ना ? तोकडा संसार मोडून जगाच्या संसाराचा पसारा थाटणाराला रुसवेफुगवे धरून चालत नसतं दादा !—

( मालक येतो आणि मुजरा करून स्वस्थ राहातो. )

**दिवाण**—काय आहे ?

**मालक**—सरकारी काम—इथंच बोलूं का ?

**दिवाण**—चला. ( उठून जाऊं लागतो—मालक त्याच्या मागोमाग जातो ) मणि आली कीं सांग मला. ऐकलंस पिरोज ? ( जातो )

**पिरोज**—मणिचं काय काम बाबांजवळ ?

**प्रभास**—मत्सर वाटला तिचा ?—हंसतेस काय ? तुला माहित नाहीं, पिरोज, मोठी लबाड आहे ती. कशी संधी साधलीन्.

**पिरोज**—कसली संधी ?

**प्रभास**—हें पहा, तुझ्यापेक्षां मला माणिचा जिव्हाळा जास्त आहे. तिचं वजन भारी झालं तर तें भूषण मला आहे—तिच्यासाठीं घडीभर तुझा पाणउतारा झाला तर मला त्यांत आनंदच आहे.

**पिरोज**—नको सांगूस !

**प्रभास**—रुसलीस ?—आतां हेंच पहा, केवढा आनंद आहे रुसण्यांत ! बोलत नाहींस ?—मी देखील रुसतों आतां. (बाजूला जाऊन बसतो. क्षणभर स्तब्धता)

( पिरोज उठून माडीकडे जाते, कठड्यावर टेकून वाट पाहाते—थोडा विचार करते आणि वर जाते. वेटर येतो )

**प्रभास**—पहा—संपला रस—मोठा मिठास आहे ! फळं ताजीं होतीं वाटतं. और लाव. ( ग्लास घेतो, वेटर मिस्किलपणें हंसत जातो. )

( प्रभास दिवाणाच्या खुर्चीजवळ येऊन उभा राहातो—वर बसतो—पुनः उठून खूर्ची ठोठावून पाहातो आणि हंसत असतां वेटर येतो )

**प्रभास**—खुर्ची शाबूत आहे ना ही ? हंसतोस काय ? बाबा बसतात म्हणून विचारतों ! शाबूत आहे ना ?

**वेटर**—तशीच मजबूत आहे ती—कांहीं भीती नाहीं तिला ! कशा गुबगुबित गाद्या आहेत ! वाटतं, वर बसावं घटकाभर पण—

**प्रभास**—पण काय ?

**वेटर**—पण छाती होत नाहीं. साहेबांचं आसन—आम्हीं नोकर माणसं—कुणी पाहिलं तर नोकरीच जायची.

**प्रभास**—ये बैस.

**वेटर**—काय हें साहेब !—

**प्रभास**—बैस म्हणतों ना ? तुझ्या नेकीवर हें सिंहासन उभं आहे. तुझ्या इमानावर बाबा आज या खुर्चीवर बसताहेत. तुझा अधिकार आहे इथं बसायचा. बैस. ( त्याला बळेंच बसवतो तोंच मणि आणि प्रकाश येतात ) आलीस—ये. ( वेटर उठून जातो ) हाच वाटतं तो तुझा चुलतभाऊ ?

**मणि**—चुलतभाऊ नव्हे—मामेभाऊ.

**प्रकाश**—नमस्ते !

**प्रभास**—तें कशाला ? घरचीं माणसं तुम्हीं—इथं हें 'नमस्ते' कशाला ? बांबांनीं तुम्हांला थांबायला सांगितलं आहे इथं-बसा—काय नाव यांचं ?

**मणि**—प्रकाश.

**प्रभास**—बसा प्रकाश. मी दिवाणांचा मुलगा—माझं नांव—

**प्रकाश**—प्रभास. मला माहित आहे. मणि सारं कांहीं सांगते मला.

**प्रभास**—असं ? मोठे भाग्यवान आहांत. हें आमचं जें कांहीं आहे तें देखील हिनं—

**प्रकाश**—हो—सांगितलं आहे.

**प्रभास**—हं—( बसून हळुहळु पीतो )

( जिन्यावर पिरोज येते )

**पिरोज**—आले ? पाठवून दे त्यांना वरती. तूं नको जाऊंस. ( असें म्हणत खालीं येते. प्रकाश हळहळु भीतभीत वर जातो. तोंपर्यंत सर्व त्याच्याकडे पाहात असतात.)

**प्रभास**—हुशार माणूस दिसतो.

**पिरोज**—आतां तरी दिसत नाहीं.

**प्रभास**—मी जें म्हणेन तें तुला पटत नाहीं.

**पिरोज**—तोंडदेखलं भाषण मला आवडत नाहीं. मला कांहीं मणिला खूष करायचं नाहीं. ज्या कामासाठीं हा माणूस पाहिजे, त्या कामाला हा लायख आहे

असं मला तरी वाटत नाहीं.

**मणि**—जरा घाबरला आहे तो !

**पिरोज**—तूं ओळखतेस ना बाबांना !—किती भीत भीत चालला होता ! धाडसाचं काम आहे तें—जिवाची कदर ज्याला नाहीं असाच माणूस पाहिजे त्या कामासाठीं.

**मणि**—तसाच आहे तो.

**प्रभास**—ऐक—तसाच आहे तो ! केवढा मर्द दिसतो. उगीच नाहीं मणिनं शिफारस केली ! ( पिरोज मागं जाते—वेटर येत असतो, त्याच्या हातची पानपट्टी बळेंच काढून घेते, तोंवर प्रभास बोलत असतो ) दुसऱ्याला खोड ठेवायची संवयच हिला. तिचं बोलणं मनावर घेऊं नकोस मणि. मोठी हट्टी आहे ती —

**पिरोज**—ही घे. ( पट्टी देते, प्रभास दचकतो आणि घेतो )

**प्रभास**—Thank you ! बॉय ! बॉय ! ! ( वेटर येतो-तो ग्लास देतांना त्याच्यावर डोळे वटारतो. तो मान खालीं घालून जातो ) अशी चूक करूं नको पुन: ! घरच्या माणसांनीं असलीं क्षुल्लक कामं करायचीं तर नोकर कशाला हवेत ?

**मणि**—काय झालं ?

**पिरोज**—कांहीं नाहीं—( वर पाहून ) अजून कुणीच कसे येत नाहींत ?

**मणि**—मला दिखील काळजी वाटूं लागली. प्रकाश घाबरला तर नाहीं ? ( मालक खालीं येतो. त्याच्याकडे धांवत जाऊन ) काय झालं ?

**पिरोज**—मणि, इकडे ये.

**मणि**—काय झालं ?

**पिरोज**—एवढासुद्धां धीर निघत नाहीं तुला ? किती हळवी आहेस. अशीच का जबाबदारीचीं कामं पार पाडणार आहेस ?

**मालक**—( पिरोजला ) मोठा उमदा माणूस आहे. साहेबांना आवडला—कामाची समजूत देताहेत त्याला.

**प्रभास**—ऐक. पाहिलंस मणि, ही हिची परीक्षा ! कुणी केलं मणिला खूष आतां ? मी कीं बाबांनीं ? नालायक होता ना तो—मग नालायक माणसाची निवड करण्याइतके बाबा भोळे आहेत कीं वशिलेबाज आहेत ? बोल ना.

**मालक**—फारच खूष झाले साहेब. मोठा तडफदार माणूस आहे ! अशीं चुरचुरित उत्तरं देत होता ! एम्. ए. आहे, तालिमबाज आहे, तरुण आहे—नि विश्वासू माणसांच्या विश्वासांतला आहे.

**पिरोज**—कुठं कुठं डांगोरा पिटणार हा ?

**मालक**—विचारलं म्हणून—

**पिरोज**—जा आपल्या कामाला.

**प्रभास**—जशी कांहीं हीच दिवाण आहे ! ( प्रकाश व दिवाण येतात )

**दिवाण**—( मणिला ) शाबास मणि—

**प्रभास**—ऐक पिरोज.

**दिवाण**—काय आहे ?—प्रकाश, उद्यां आपल्या कामावर हजर व्हा. समजलं !

**प्रकाश**—जी. ( इकडे तिकडे पाहातो–आणि मुजरा करून जातो )

**दिवाण**—एक काळजी दूर झाली. नेकीचा माणूस पाहिजे होता. चल मणि, तुला घरीं पोंचवतों. ( दोघे जातात. मालकही जातो )

**प्रभास**—तुझ्याकडे पाहिलंसुद्धां नाहीं बाबांनीं !

**पिरोज**—हं—पण तुझ्याकडेही पाहिलं नाहीं.

**प्रभास**—कां ? ' काय आहे ' म्हणाले ते.

**पिरोज**—तेवढ्यावरच खूष ! हं !—एकूण **मी** मूर्ख ठरलें !

**प्रभास**—तुला कोण मूर्ख म्हणेल ? बाबांचा केवढा विश्वास तुझ्यावर ! मी हा असा—कुणींच माझ्याकडे बऱ्या नजरेनें बघत नाहीं. ही मणि—हिच्यासाठीं मी एवढा तळमळतों—पण पहावं तर ती तुझ्याभोंवतीं घोंटाळत असते. बाबांची तर तूं confidential adviser !—कां ? घोडीसारखी फुरफुरलीस कां ? तुझा मत्सर करीत नाहीं मी—मी वस्तुस्थिती सांगतोंय्—

**पिरोज**—पुरे—किती बडबडशील ! पान खाल्ल्याचा परिणाम दिसतोय् !

**प्रभास**—अशी डिवचूं नकोस मला ! हो—मी पान मागितलं ? कां ? बोल ना ?—

**पिरोज**—तुलाच माहीत !

**प्रभास**—अशी रागावूं नकोस. तुझ्याच आधारावर ना माझे सारे चोंचले चालले आहेत ?—आतां मी प्यायलों—प्रत्यक्ष बाबांसमक्ष पीत होतों—मणिसमोर पीत होतों—एवढासुद्धां कचरलों नाहीं—कां ?—तूं होतीस म्हणून ना ?—माझी खात्री होती—तूं माझा विश्वासघात करणार नाहींस—म्हणूनच ना मला एवढा धीर झाला ?—

**पिरोज**—अन् मी सांगितलं तर ?

**प्रभास**—तूं सांगणार नाहींस !

**पिरोज**—कशावरून ?

**प्रभास**—मी तुला ओळखतों—चांगला ओळखतों—X Ray सारखी दृष्टी आहे माझी—मी असा तुझ्या डोळ्यावाटे तुझ्या अंतरगांत पाहात असतों—अगदीं नाडीवर बोट ठेवून पाहातात तसा पाहात असतों—नि मग वाटेल तें करतों—

**पिरोज**—माझी बुद्धी पालटली—

**प्रभास**—पालटणार नाहीं. माझ्यासाठीं नव्हे—बाबांसाठीं नव्हे—दारूबंदीच्या तत्त्वासाठींही नव्हे. तूं कुणासाठीं असा स्वतःचा कोंडमारा करते आहेस तें तुझं तुलाच कळत नसावं—तूं स्वतःला फसवतेय्स ! हें वात्सल्य नव्हे—बंधुप्रेम नव्हे – तत्त्वनिष्ठाही नव्हे—पिरोज, पोरी, हें तुझं मातृप्रेम आहे—मणिसाठीं तूं तोंडाला खीळ घालून बसली आहेस—मणिला धक्का बसेल म्हणून भीते आहेस —माझी बदनामी झाली तर तुला वाईट वाटेल—नाहीं असं नाहीं—पण मणिला धक्का बसेल याची भीति तुला जास्त वाटते. होय ना ? बोल ना पिरू.

**पिरोज**—झालं ?—संपलं बोलणं तुझं ?

**प्रभास**—नाहीं—अशी चुकवाचुकवी करूं नकोस. सरळ सरळ कबूल कर. होय म्हणायला भीतेस ? एवढी धीराची बायको तूं—माझ्यासमोर कबुली द्यायला भीतेस ? बोल ना ?

( पिरोज मुकाट्यानें निघून जाते. )

**प्रभास**—स्त्रीची जात ! हंः !!—( इकडे तिकडे फिरतो. खुर्चीजवळ येऊन ती ठोठावतो—इकडे तिकडे खुर्ची चापसूं लागतो तोंच मालक येतो. )

**मालक**—( हळूच ) हं थांबा—आवाज होईल !—

**प्रभास**—अस्सं !—बरं—चांगली बतावणी केलीत ?

**मालक**—कसली ?

**प्रभास**—प्रकाशबद्दल.

**मालक**—मुळींच नाहीं. खराच तो माणूस मोठा बेडर दिसतो. इथं येतांच कां असा बावरतो देव जाणे ! साहेबांसमोर असा बोलत होता—एवढी माहिती मिळवली आहे बेट्यानं—ऐकतांच मी थक्क होऊन गेलों. भीति वाटूं लागलीय् मला. बाकीच्यांच्यासारखा नाहीं दिसत हा ! विरघळायला फार कठिण दिसतो—साध्या आंचेनं काम भागणार नाहीं. रुपेरी आंचेच्या पलीकडे जावं लागणार !—

**प्रभास**—अंदाज नुसता—

**मालक**—नाहीं—माझी खात्री आहे. तुमच्या पेक्षां—नव्हे तुमच्या वडलां-पेक्षांही माझी माणसाची परीक्षा जास्त अचुक आहे. असा तसा नाहीं हा बच्चा—कुणी सांगावं, हा कांटा अस्सा मोडून सुद्धां टाकावा लागेल—

**प्रभास**—हं हं !—

**मालक**—दया आधीं आपली करायची—मग जगाची—अगदीं शेवटीं वैऱ्याची. त्यांतून असला कडक वैरी दिसला, कीं आधीं त्याच्या गळयांत हात टाकायला हवा—मैत्रीसाठीं नव्हे—मुंडी मुरगळण्यासाठीं !—दचकलांत ? अन् प्यायला हवं म्हणे !—दारुबंदीनंतर ज्याला प्यायला हवं त्यानं मन मारून मुर्दाड बनलं पाहिजे. मी पैशासाठीं मरतों आहें—तुम्हीं तलफेसाठीं मरतांहांत—पैसा काय, तलफ काय, दोन्ही सारखींच. दोन्ही बेडर बनवतात माणसाला. असा धीर सोडून कसं होईल ! 'ती' पाहिजे ना ? मग माणसांची मुंडी मुरगळायला भिऊन कसं चालेल ?

**प्रभास**—बेरड आहेस.

**मालक**—आहेंच—अन् म्हणतों, आपणही आतां तसेच बना—ती हवी ना ?—

**प्रभास**—ती हवी ना !—ती हवी—जीव कासावीस होतो तिच्याविना. पण तेवढ्यासाठीं का बेरड बनायचं ?

**मालक**—सोडा तर ती !

**प्रभास**—सोडली असती—पण संधि आहे—सवड आहे,—मग कां सोडूं ?

**मालक**—मग दयामाया सोडा—माणुसकी सोडा.

**प्रभास**—तेवढंच मोठं कठीण आहे. माणुसकीचा फार अभिमान आहे मला. ती सुद्धां सोडीन पण माणुसकी सोडणं फार कठीण जाईल मला. बाबांचा मुलगा आहें ना मी ? माणुसकीचा फार केवा आहे आम्हां लोकांना. बहिण पाहिलीत ना माझी ?—अशीं विलक्षण माणसं आहोंत आम्हीं—अगदीं मुलखावेगळीं माणसं आहोंत आम्ही. म्हणूनच व्यवहारी माणसांशीं आमचं जुगत नाहीं.

**मालक**—मोठी हुशार आहे तुमची बहिण.

**प्रभास**—कळलं ना ? मग सावध राहा तर. पोर आहे म्हणून बेसावध राहाल तर आपल्या नि माझ्या दोघांच्याही गळ्याला तांत लावाल. मुलगाबिलगा कांहीं क्षिति धरणार नाहींत बाबा—राक्षस आहे तो—अशाकामीं दयामाया

त्यांच्या खातरजमेंत नाहीं यायची.

**मालक**—अगदीं अक्षरशः खरं आहे. म्हणूनच ना मी ही नोकरी पत्करली ? कसा निर्धास्त झालोंय् या नोकरीमुळं—लपवालपवी कांहीं करावी लागत नाहीं—नाहींतर तळघर पोखरून उद्योग चालवावा लागला असता. अमेरिकेंत देखील नाहीं का अशीं भुयारं खणलीं होतीं त्यावेळीं ?

**प्रभास**—बाबा येतील आतां. अन् ती कारटीही इथंच कुठं तरी कानोसा घेत असायची.

**मालक**—तिला नाहीं ना कांहीं संशय आलेला ?

**प्रभास**—संशयच कशाला यायला हवा. ती मोठी चाणाक्ष आहे. खुद्द बाबांचा देखील संशय घ्यायला कमी करायची नाहीं. या कार्याची खरी कळकळ आहे तिची—अन् त्या मणीची. बाबांच्यावर ताण आहे त्या दोघींची—अन् आज तो टारझन घेऊन आली आहे मणि—माणूस मोठा बिकट दिसतो. लालुच दाखवायचा प्रयत्न करूं नकोस हों—

**मालक**—छे छे ! मी एवढा का मूर्ख आहें ?

**प्रभास**—पैशाला हपापलेल्या माणसाच्या मूर्खपणाला कांहीं मर्यादा घालतां येत नाहीं—हा असोसच केव्हांतरी त्याचा गळा कापतो. दिवाळीं वाजतात या धडाडीवाल्या श्रीमंतांचीं, तीं या अनावर हावरेपणामुळंच. म्हणून म्हणतों—कोण आलं ?—जा पाहूं आतां. ऐका ! नजर ठेवा, ही खुर्ची शाबूत राहिली पाहिजे.

**मालक**—जी—( मालक हंसत जातो, प्रभास दोन्ही दरवाजाकडे डोकावून परत येतो. प्रभास येतो. )

**प्रभास**—या इन्स्पेकटर साहेब—

**प्रकाश**—साहेब आहेत ?

**प्रभास**—मला काय माहित ! मी कांहीं त्यांचा चपराशी नाहीं.

**प्रकाश**—माफ करा—फार जरुरीचं काम आहे—

**प्रभास**—मला सांगा ना.

**प्रकाश**—तसा हुकूम नाहीं मला.

**प्रभास**—मग काढा शोधून तुमचे साहेब कुठं आहेत ते. ( जाऊं लागतो )

**प्रकाश**—( त्याच्या मागून जात ) कृपा करा, फार जरूरीचं काम आहे—साहेबांची भेट आतां झालीच पाहिजे. निदान कारभारी तरी—

**प्रभास**—दिवाणांच्या पोटच्या पोरापेक्षां दिवाणांचा कारभारी जास्त विश्वासू अं !

**प्रकाश**—क्षमा करा—हें सरकारी काम आहे.

**प्रभास**—मग त्या नायब दिवाणांना बोलावूं का ?

**प्रकाश**—कोण नायब दिवाण !

**प्रभास**—माझी बहीण—कॅप्टन पिरोज—पहिल्या साडीपलटणीची कमा-ण्डर-इन-चीफ !

**प्रकाश**—तसा हुकूम नाहीं मला.

**प्रभास**—मोठे कठिण दिसतात हे हुकूम. हें पहा, असल्या हुकमेहुकूम जगांत मी वावरलेला नाहीं. मी एक उनाड मुलगा आहें. बसा इथं स्वस्थ अन् बाबा येईपर्यंत वाट पाहात राहा. ( जाऊं लागतो, दारांत पिरोज येते, ती येतांच तिच्या बरोबर मागें परततो )

**पिरोज**—काय आहे ?

**प्रकाश**—दिवाणसाहेबांची भेट पाहिजे मला—आत्तां—अगदीं आत्तांच्या आत्तां. फार जरुरीचं काम आहे.

**पिरोज**—उद्यांपासून कामावर रुजू होणार ना तुम्हीं ?

**प्रकाश**—होय—पण—

**पिरोज**—मला वाटतं, तुम्हीं उद्यां या.

**प्रकाश**—नाहीं. नोकर म्हणून नव्हे—एक नागरीक म्हणून भेटायचं आहे मला. मोठी महत्वाची बातमी लागली आहे मला.

**प्रभास**—मला सांगत नाहीं—कारभारी चालेल म्हणतो पण मुलगा नको.

**पिरोज**—जरा गप्प राहशील दादा. काय बातमी आहे ?

**प्रकाश**—मला साहेबांचीच भेट पाहिजे.

**पिरोज**—शाबास !—बसा इथं. साहेब येतील इतक्यांत.

**प्रकाश**—पक्षाला पंख फुटले आहेत, केव्हां उडून जाईल याचा नेम नाहीं.

( दिवाण बाहेरून येतो, प्रकाश मुजरा करतो )

**दिवाण**—काय आहे ?

**प्रकाश**—एक बातमी आहे—

**दिवाण**—उद्यां तुम्हीं नोकरीवर रुजू होणार ?

**प्रकाश**—नागरीक या नात्यानं—इन्स्पेक्टर म्हणून नव्हे—दारुबंदीचा अभि-मानी म्हणून—

**दिवाण**—ठीक. या. ( दिवाण आणि प्रकाश माडीवर जातात )

**प्रभास**—तूं सुद्धां पारखी झालीस अं ? मी तर बोलून चालून नावडताच—तूं अगदीं अंतरंगातली—ती तूं सुद्धां—

**पिरोज**—गप्प बैस !

**प्रभास**—अन् ' दादा ' म्हणतेस मला !

**पिरोज**—हें ढोंग कां करतोस ? काळीजच नाहीं का तुला ? कसं कळत नाहीं एवढं ! बाबांची जबाबदारी बाबा जाणतात—त्यांत ढवळाढवळ करायचा अधिकार तुलाही नाहीं नि मलाही नाहीं.

**प्रभास**—तिटकारा आला या लपंडावांचा. प्रत्येकाचा प्रत्येकावर अविश्वास. जिकडे पाहावं तिकडे चोराचोरी—लपवालपवी. प्रत्येकजण प्रत्येकाला संशयानं पाहातो. बाप मुलाला, मुलगा बहिणीला—रमणी वल्लभाला—वल्लभ शेजाऱ्याला—सारींच डोळे बारीक करून पाहातात एकमेकांकडे !

**पिरोज**—आणि तूं ?

**प्रभास**—मी पुष्कळ लपवालपवी करीन, पण तुझे डोळे आहेत ना तिखट ?

**पिरोज**—म्हणजे आपणहून कांहीं तूं सांगत नाहींस. शोधून काढावं लागतं दुसऱ्याला ? होय ना ?

( प्रभास कांहीं न बोलतां जिन्याकडे जाऊन वर पहात राहातो, पिरोज त्याच्या-जवळ जाऊन उभी राहाते )

**पिरोज**—काय पाहातो आहेस ?

**प्रभास**—आकाशांतले तारे काय कौल देतात तें अजमावतों आहें.

**पिरोजः**—कारभारी कुठं आहेत ?

**प्रभास**—आपल्या गुहेंत !—खर्डे घांसतो आहे लेकाचा—लेखणी चालवतो आहे !—शाई नासवतो आहे निष्कारण—( थांबून ) कोण जाणे, दुसरंच कांहीं करीत असेल. मला तरी कुठं धड माहित आहे ? इथंच आहें ना मी केव्हांपासून !—बॉय्—बॉय्—( वेटर येतो ) संत्र्यांचा रस आण थोडा—( बॉय जाऊं लागतो )

**पिरोज**—थांब.—( प्रभासला ) पुरे आतां. तेवढ्यानं नाहीं तृप्ति झाली ?

**प्रभास**—( वेटरला ) बरं—बरं—पाणी आण थोडं गरम—अगदीं गरम !—

**वेटर**—चहा आणूं ?

**प्रभास**—नाहीं—पाणी—साधं नळाचं पाणी—अगदीं गरम—घसा भाजित

जाईल इतकं गरम. जा. ( वेटर जातो ) कींव आल्यासारखी काय बघतेस माझ्याकडे ? प्रत्येकाला कांहीं तरी व्यसन असतं—तुला नाहीं का हें एक व्यसन ?

**पिरोज**—कसलं ?

**प्रभास**—गगनाला गवसणी घालायचं ? दारुबंदी करताहेत म्हणे. दारू कधीं बंद झाली आहे ?—अग यज्ञ करतील लोक—वेदांचा उद्धार करतील—आर्यसंस्कृतीचं पुनरुज्जीवन करतांना सोमपान करतील. मग धर्मांत कसा हात घालणार तुम्हीं ? कुणाच्या धर्मावर आघात करतां येतोय् का आम्हांला ?—

**पिरोज**—गप्प राहा—गप्प राहा—गप्प राहा म्हणतें ना ? एक शब्दसुद्धां बोलूं नकोस.

**प्रभास**—अशी आहे ही धर्माची मात्रा ! कशी वाचा फुटली ! कशी पिसाळली—चवताळली—खवळली ! हा धर्माचा प्रभाव बरं ! ठरलं—उद्यांपासून आपण याज्ञिक होणार—( मणि घाबऱ्या घाबऱ्या येते ) ऐकलंस मणि, उद्यांपासून मी याज्ञिक होणार—अग्निहोत्र घेणार—

**मणि**—थांबा—( पिरोजला ) प्रकाश आलाय् इथं ?

**पिरोज**—होय. वर बाबांबरोबर बोलतोय् ! इकडे ये—( दोघी बाजूला जातात )

**प्रभास**—मीच चोर झालों अं ! अन् ही म्हणे माझ्यावर प्रेम करते !—लग्न-सुद्धां करणार म्हणे माझ्याबरोबर ! कसं होणार पुढं माझं ? यज्ञदेवते, वेदोनारायणा, कुणालाच का माझी दया येत नाहीं ? ( वेटर पाणी घेऊन येतो ) देवासारखा धांवलास माझ्या हाकेला ! दे.

**वेटर**—पाणी—नुसतं पाणी ! हं ! ( निश्वास टाकतो ) निसर्गाचं निर्मळ पाणी—जमिनीतून पाझरलेलं पाणी ! आकाशगंगेचं जीवन नव्हे—साधं पाणी—हरहर !—

**प्रभास**—जा आपल्या कामाला. ( वेटर जातो ) त्या पाहाताहेत इकडे ! पिरू—अग, झालीं का खलबतं ? इकडे माझ्याकडे जरा बघा की !—( वरून दिवाण व प्रकाश येतात—दुसऱ्या बाजूनें मालक येतो. ) झालीं का खलबतं सर्वांचीं ?

**दिवाण**—जा—तो लखोटा ठेवा नीट जपून. पोलिसांची तुकडी घ्या बरोबर. तो हुकूम दाखवलात कीं सुपरिंटेण्डण्ट करील सारी व्यवस्था—

**मालक**—नक्कल ठेवली पाहिजे का त्या हुकमाची ?

**दिवाण**--कांहीं नको. डेमिऑफिशल काम आहे तें! ( प्रभास आणि मालक एकमेकांना खुणावतात ) जा. ( प्रकाश मुजरा करून जातो ) ( मालकास ) जा तुम्हीं आतां. घरीं जा—समजलं ?—घरीं जा.

**प्रभास**—अन् मीही जाऊं का ? ( दिवाण त्याच्याकडे नुसता पहात राहातो—प्रभास पाणी पीत पीत निघून जातो )

( दिवाण येरझाऱ्या घालीत फिरत असतां पिरोज व मणि पुढें येतात )

**दिवाण**—कसा या दिव्यांतून मी पार पडणार पोरींनो ?—विश्वास तरी कुणावर ठेवूं ? बोलायचीसुद्धां चोरी ! लढाईचं राजकारण देखील फिकं वाटतं यापुढं ! कसं जाळं पसरताहेत चोहींकडून—अजून चोरटे व्यवहार थांबत नाहींत अं ! कोण कोण सामिल असतील या कारस्थानांत ?—( मणिला ) मोठा हुशार आहे हा प्रकाश. प्रत्येक काम कसं मुद्देसुद करतोय् ! उगीच नाहीं वायफळ बडबड करीत बाकीच्यांसारखा. ( पिरोजला ) मोठा धीर आलाय मला.—पण त्या धीरामुळंच खचून जातोंय मी. काय होणार ?—काय होणार ?—अमेरिकेची का पुनरावृत्ती होणार ?—

**पिरोज**—नाहीं—

**दिवाण**—थँक्स !

**पिरोज**—हें भारतवर्ष आहे. युरोपांतल्या दारुडयांची वसाहत नव्हे ही !

**दिवाण**—शाबास—( खुर्चीत बसतो ) एवढाच धीर पाहिजे मला ! एक धीराचा शब्द—बलभीमाच्या बळानं जगाशीं झगडेन तो शब्द मिळाला तर ! करा म्हणावं विश्वासघात !—त्याला सुद्धां मर्यादा आहे.—पिरू, इकडे ये—इथं बैस—मणि, तूं इथं बैस !—( दोघी खुर्चीच्या दोन हातांवर बसतात ) केवढा धीर आला मला !—या दोन तोफांच्या जोरावर सारं जग जिंकीन !—मणि, बाळ, तोंड उघड आणि एक गाणं म्हण—पाळण्यांतल्या कावलेल्या मुलाला गप्प करण्यासाठीं आई जसं गुणगुणते, तसं कांहीं तरी म्हण—

**पिरोज**—( त्याच्या मस्तकावर हात ठेवून ) काय डोकं तापलं आहे !

[ मणि गाऊं लागते. गाण्याच्या शेवटीं दिवाणाचे डोळे मिटतात. त्या दोघी त्याच्याकडे निरखून पाहात असतां पडदा पडतो ]

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

( मणीच्या घराचा दर्शनी भाग. दरवाजा—दोन बाजूला बंद असलेल्या खिडक्या—पुढें सहा पायऱ्या—त्यांना दोन्हीं बाजूंना कठडे—कठड्याच्या दोन्ही भागांना फुलझाडांच्या कुंड्या—पुढें बाग असावी व कपौंड असावें असा भास उत्पन्न होण्याजोगी रचना. )

[ पडदा वर जातांच तेथें कुणी नाहीं. डाव्या बाजूनें प्रभास प्रवेश करतो. पायऱ्या चढून जातो—दरवाजा ठोठावण्यास हात पुढें करतो—तोंच फुलझाडा-कडे लक्ष जातें—एक फूल तोडून घेतो, हुंगित राहातो—तोंच दरवाजा उघडतो व प्रकाश बाहेर येतो ]

**प्रकाश**—अं ? कोण ? तुम्हीं ?

**प्रभास**—काय झालं एवढं आश्चर्य वाटायला ? काय मला इथं यायचा अधि-कार नाहीं ?—कीं यापूर्वी कधीं आलों नव्हतों इथं ?—कीं मी कुणी चोर दरोडेखोर आहें ?—काय वाटलं ?

**प्रकाश**—सहज उद्गार निघाला, त्याचा काय विपर्यास करतां ?—कुणी म्हटलं तुम्हीं इथं येऊं नये म्हणून ?—खरं म्हटलं तर मीच इथं क्वचित येत असें. म्हणूनच यापूर्वी आपली कधीं गांठ पडली नाहीं—

**प्रभास**—मग हा एव्हढा जिव्हाळा कसा सहवासावांचून ?

**प्रकाश**—मणीच येत असे माझ्या घरीं.

**प्रभास**—हं ! वारंवार ?

**प्रकाश**—तिचे बाबा बरे होते तेव्हां मला बंदी केली होती त्यांनीं. तेंच पडलं अंगवळणी—म्हणून येत नव्हतों कधीं.

**प्रभास**—या पोषाखांत मोठे छान दिसतां तुम्हीं प्रकाश !—दृष्ट लागायची माझी—ठीक. कसं काय चाललं आहे ?

**प्रकाश**—काय चालायचं ?—आंत या ना ?—मणि आली नाहीं अजून... म्हणूनच चाललों होतों परत. बाहेरच काय बोलत राहायचं ?

**प्रभास**—नाहीं ना ती ?—( पायरीवर बसतो—प्रकाश खालीं उतरतांना शेवटच्या पायरीवर थबकतो ) जात होतां वाटतं ! टेहेळणी आहे कुठं ?—शाबास ! —दरारा बसला आहे साऱ्या दारूवाल्यांना ! पिरोजला नव्हतं पटत—पण माझी परीक्षा चुकायची नाहीं. हंसू नका—मी तोंडदेखली स्तुति करीत नाहीं—पण बाबा आतां केवढे खूष झाले आहेत !—

**प्रकाश**—मी माझं कर्तव्य बजावतों आहें. साहेबांना खरंच समाधान वाटतंय् ?

**प्रभास**—बसा, बसा या कठडयावर. मणि येईल कीं इतक्यांत !—

**प्रकाश**—तसं कांहीं विशेष काम नाहीं. सहज आलों होतों—असले माझे हे अनुभव सांगायला !

**प्रभास**—हं ! डेस्डिमोनेला अथेल्लो असेच आपले अनुभव सांगत असे, नाहीं !

**प्रकाश**—मी मामेभाऊ आहें तिचा.

**प्रभास**—भाऊ नव्हे—मामाचा मुलगा—‘ भाऊ ’ शब्द मोठा वाईट. अश जागीं लावूं नये तो शब्द !

**प्रकाश**—मी ‘ ताई ’ म्हणतों तिला.

**प्रभास**—मीसुद्धां तिला मणिताई म्हटलं असतं—पण तिलाच आवडत नाहीं—

**प्रकाश**—पण मी म्हटलेलं आवडतं.—जातों मी—

**प्रभास**—कां ? भीती वाटली माझी ?

**प्रकाश**—प्रभास, मी एक सरळ साधा शिपाई गडी आहें. तेढे मार्ग मला माहित नाहींत. मी पांढऱ्याला पांढरं नि काळ्याला काळं म्हणतों. पांढऱ्याचं काळं करून पचवण्याइतका मी मुत्सद्दी नाहीं. मी बहिणीला ‘ ताई ’ म्हणतों —शेजारणीला ‘ ताई ’ म्हणण्याचा औपचारिक प्रघात मला माहित नाहीं नि माहित करून घ्यायलाही नको. समजलं ?

**प्रभास**—भारीच रागावलांत बुवा !

**प्रकाश**—जाऊं मी ?

**प्रभास**—आतां कसले जातां ? ही आलीच कीं मणि—( मणि पोलिस वेषांत येते ) ये—हे चालले होते; यांना राहून घेतलं मी. म्हटलं, कधीं नवतीचा पाहुणा आलेला, निराश होऊन जायला नको.

**मणि**—चला ना आंत.

**प्रभास**—कोंडलेलं आवडत नाहीं मला. बैस कीं इथंच—बसा हो ! बरं, नको—पोषाख बिघडायचा तुमचा. मोठा रुबाबदार दिसतो नाहीं हा पोषाख !

**मणि**—ऐक आतां प्रकाश. यांनादेखील असंच वाटतंय् बघ.

**प्रकाश**—जातों मी. मग येईन.

**प्रभास**—( उठून ) नको—नको—तुमचं चालू द्या खलबत. माझं काहीं तसं फारसं काम नाहीं.

**मणि**—( प्रकाशला ) बैस ना—( प्रभासला ) बसायचं म्हटलं !—मलासुद्धां असं उघड्यावर बसणं फार आवडतं. घरांत खरोखरच कोंडल्यासारखं वाटतं. अन् घरांत बसून तरी काय करायचं ? कुणाशीं बोलायचं ? भींतीशीं—कीं सैपाकिण बाईशीं ?—

**प्रभास**—कीं गडी माणसाशीं ?—खरं आहे तें—पण गुप्त गोष्टी बोलायला बाहेर बसणं धोक्याचं असतं.

**मणि**—कसल्या असायच्या आमच्या गुप्त गोष्टी ?—

**प्रभास**—दारुबंदीच्या—पकडापकडीच्या—छापे-झडत्या-खटले-शिक्षा--मारे धुमाकूळ उडवून दिला आहे यांनीं. त्यांच्या हकिकती आपल्या लाडक्या 'ताईला' सांगायच्या कुणाला यांनीं ! तसं लग्न झालं असतं तर गुपितांची सत्तेची भागेदारीण घरांतच सांपडली असती. लग्न झालेलं नाहीं ना तुमचं ?

**प्रकाश**—या एकाच ध्येयाला वाहून घेतलं आहे मी.

**मणि**—दारुबंदीशीं लग्न लागलंय् म्हणतो तो !

**प्रभास**—लग्नाइतकंच हें ध्येय पुरेल तुम्हाला. उभा जन्म खर्ची घालावा लागेल या ध्येयासाठीं.

**प्रकाश**—हें मात्र खरं आहे.

**प्रभास**—( मोठ्यानें हंसतात ) म्हणजे ? जन्मभर दारूबंदी करीत बसणार ? जन्मभर पकडापकडी करीत बसणार ?—नायनाट नाहीं व्हायचा या विषाचा ? मग कशाला केलीत दारूबंदी ?

**मणि**—तसा नायनाट झाला दारूचा तर, मला वाटतं, प्रकाशला बरं नाहीं वाटायचं. बंदी पुरेपुर झाली मग याला काय राह्यलं काम ?—हीं अशीं असतात हीं वेडपीं !—गुन्हे शोधायचा हव्यास, म्हणूनच गुन्हे होत राहावेत असं वाटत असतं या लोकांना. गंमत आहे नाहीं ?

**प्रभास**—अशीं माणसं आहेत म्हणूनच जगांत गुन्हे होताहेत. जितके कायदे कडक तितके गुन्हे जास्त व्हायचे—तितके इन्स्पेक्टर जास्त लागायचे !

**मणि**—कां रे, बोलत कां नाहींस ?

**प्रकाश**—हें नव्हतं माझ्या ध्यानांत आलं.

**प्रभास**—शिकारी कुत्र्याची हुंगण म्हणतात ती ही ! माझं आपलं असं आहे, कुत्रा होण्यापेक्षां शिकार होणं मला जास्त आवडेल. पळतां तरी येतं. पाठलाग करायला डोक्यांत अक्कल लागते—पळायला नुसती पायांत ताकत असली कीं बस्स !

**प्रकाश**—अनुभव असाच येतो खरा. आज मला एक दृष्टी आली. असंच सावध करीत रहा मला. फार आभारी होईन तुमचा.

**प्रभास**—कधीं गांठीभेटी पडतील तेव्हां ना बोलायचं ? आज ही पायरीवर भेट झाली म्हणून बोललों. बाबांकडे आलांत कीं तुम्हीं गुप्त पोलीस. तिथं कोण देईल तुमच्या डोळ्याला डोळा ?

**प्रकाश**—आतां भेटत जाईन वारंवार ! जाऊं मी ?

**प्रभास**—या. ( प्रकाश जातो ) मोठा नेकीचा माणूस ! लाखांत एक माणूस आहे ! केवढा दरारा बसवला आहे बेटयानं ! मी दारूवाला असतों तर याच्या भयानं जीव दिला असता. बैस ना इथं—इथं—इथं अगदीं माझ्याजवळ.

**मणि**—माणसं जाताहेत ना पलीकडनं ?

**प्रभास**—माणसं काय नि जनावरं काय—काय म्हणून कुणाला भ्यायचं ? ही दारुबंदी आली नसती तर आज आमच्या घरांत कोंडून पडली असतीस—

**मणि**—कोंडून पडलें असतें !

**प्रभास**—हो ! मुळींच सोडलं नसतं मी तुला—नि मी ही कुठं बाहेर गेलों नसतों.—अन् तुला तर ही भिरभिरी आवडते ! मी आपला एक काव्यमय जीव आहें. कुठं तरी रंगून राहावं असं मला वाटत असतं. एकटेपणा आवडत नाहीं—

**मणि**—मलाही नाहीं आवडत एकटेपणा—

**प्रभास**—म्हणूनच जातेस पोलिसकी करायला. पण तसली वर्दळ मला नको आहे. मला पाहिजे आहे—काय बरं मला पाहिजे आहे ?

**मणि**—बरं काव्य चाललंय् !

**प्रभास**—मला काय पाहिजे ? मला असं कांहीं पाहिजे आहे, कीं ज्यांत मी रंगून जाईन—बेभान होईन—आपलेपणा विसरेन—अगदीं अगदीं नाहींसा होईन, असं कांहीं तरी मला पाहिजे आहे.

**मणि**—दारूबाज असंच कांहींसं म्हणतो.

**प्रभास**—समज मी दारुड्या आहें—

**मणि**—चला ! भलतंच !

**प्रभास**—असतोंच दारुड्या, तर तूं काय केलं असतंस ?

**मणि**—संसार थाटला असता एकदम—लग्न करून ! माझ्या आईला जें साधलं नाहीं तें करून दाखवलं असतं. माझ्या प्रेमाचे प्याले भरभरून पाजले असते नि मग पाहिलं असतं कशी तुमची दारू सुटली नसती ती !

**प्रभास**—( मोठ्यानें हंसत ) वेडी आहेस !

**मणि**—तुम्हांला काय माहित दारुड्याची सायकॉलजी ? जन्मभर तीच पहात होतें मी. सारखा विचार केलाय् ! आईचा आकस्ताळीपणा बाबांची दारू वाढवायला कसा कारण झाला, तेंच मी पाहिलं आहे. सहन करतां नये नि चिडूनही जातां नये. मोठं समतोल ठेवलं पाहिजे मन—सारखं हेरीत राहिलं पाहिजे.

**प्रभास**—मग होतोंच तर मी दारुड्या.

**मणि**—पुष्कळ व्हाल, पण आतां दारू कुठं आहे.

**प्रभास**—हो, तेंही खरंच—पण प्रकाश अजून पकडतो आहेच असले लोक. कुठं तरी दारुबाजी सुरू आहे—

**मणि**—आतां किती दिवस ?—

**प्रभास**—तेंच पाहायचं आहे ! पण या दारूला काय करणार ?

**मणि**—कुठल्या ?

**प्रभास**—प्रेमाच्या ! मदिरा पत्करेल—मदिराक्षी महाकठीण !

**मणि**—दोन्हीही सारख्याच महाकठीण !—त्याच जोरावर ना मी आव्हान देतें आहें ?

**प्रभास**—छान ! आतां प्यायचीच दारू. चोरून मारून कुठं मिळेल तिथून मिळवायची—तुझं सारखं हेरणं सुरू व्हावं म्हणून हो !

**मणि**—त्याला दारूच कशाला प्यायला हवी ?

**प्रभास**—तुझी नजर हल्लीं आहे दारूवर. नाहीं तिथून दारू शोधून काढायचा तुला हव्यास लागला आहे हल्लीं—म्हणूनच ना हा प्रकाश आणलास ? म्हणूनच ना हल्लीं एवढी त्याची काळजी घेते आहेस त्याची ?—

**मणि**—तसंच अघोरी काम आहे तें—केव्हां काय होईल याचा नेम नाहीं.

**प्रभास**—पण माझी उपेक्षा होते आहे ना त्यामुळं ? मी काय करूं ? या

तुमच्या सार्वजनिक कार्यांत कांहीं आपलं मन रमत नाहीं. तसं असतं, त१ सारखा हिंडलों असतों तुझ्या बरोबर. त्यांतून आतां तुम्हीं लोकांनीं ही साडी- पलटण तयार केली—म्हणूनच ना मी सोडून दिलं तें सारं ? केव्हां संपणार ही दारूबंदी ?

**मणि**—संपायची नव्हे—पुरी व्हायची. दारूबंदी निश्चित झाली—

**प्रभास**—कीं संसार थाटायचा—लग्न करून ! अन् मग मला वाटतं बाबाही देतील दिवाणगिरी सोडून—कशी सारीं मजा करूं एके जागीं—

**मणि**—अन् पिरोज गेली तर ?

**प्रभास**—कुठं ?

**मणि**—ही जशी मी येणार तशी ती गेली तर ?

**प्रभास**—मला नाहीं वाटत ती कुठं जाईल म्हणून. हंसूं नकोस—मी तिला चांगला ओळखतों—

**मणि**—भ्रम आहे !

**प्रभास**—कसा ?

**मणि**—दारूबंदी पुरी झाली कीं मग तिला काय आहे काम ?

**प्रभास**—कां ? मी करणार आहें ना एक दुसरी चळवळ सुरू !

**मणि**—कसली ?

**प्रभास**—दारूसारखेंच अनर्थ घडवणारी आहे ना एक बाब ?

**मणि**—दारूसारखी ?

**प्रभास**—दारूपेक्षांही भयंकर—

**मणि**—दारूपेक्षांही भयंकर ?

**प्रभास**—हो—प्रेम ! प्रेमबंदीची चळवळ सुरू करणार आहें मी. फारशी खटपट करावी लागणार नाहीं त्याला. हें व्यसन फक्त आम्हां सुशिक्षित लोकांतच आहे. कुणबी माळी लोक नुसते लग्न करतात—पण हे दारूसारखंच विलायतेहून आलेलं प्रेम—

**मणि**—विलायतेहून आलेलं ?

**प्रभास**—हो, पूर्वी कुठं होतं हें प्रेम ? संस्कृत काव्यं पहा—नाटकं पहा—कुठं आहे प्रेम त्यांत ? त्यावेळीं नुसती मदनबाधा होती. शंकराची पार्वती असो—दुष्यंताची शकुंतला असो—कीं पुंडरीक महाश्वेता नि चंद्रापीड कादंबरीची जोडी असो—साऱ्यांना एकजात मदनबाधा होत होती. कुणी प्रेम करीत

नव्हतं कुणावर !

**मणि**—भलतंच !

**प्रभास**—वाचून पहा. उगीच बोलूं नकोस. हें विलायती प्रेम आम्हां इंग्रजी शिकलेल्यांनाच फार नाडतं आहे. म्हणूनच प्रेमबंदीचं बिल आणवणार आहें कौन्सिलांत—असा पाठिंबा मिळेल साऱ्या शेतकऱ्या कामकऱ्यांचा—

**मणि**—पुरे झाला विनोद !

**प्रभास**—विनोद वाटला तुला हा ? बाबांनीं जेव्हां दारूबंदीची भाषा सुरू केली. तेव्हां लोक अशीच थट्टा करीत होते—पण आतां झाला कीं नाहीं तो कायदा पास ?

**मणि**—पण प्रेमाची गोष्ट निराळी आहे. ' प्रेम परमेश्वर स्वयें परंधाम ' !

**प्रभास**—दारुडेही असंच म्हणतात. ज्याचं त्याचं आवडतं शास्त्र असतं. जो तो आपल्या व्यसनाची तरफदारी करीत असतो.

**मणि**—पण प्रेम म्हणजे व्यसन का ? प्रेमाला बंदी झाली तर मी वेडी होईन.

**प्रभास**—दारुडेही असंच म्हणतात.

**मणि**—अन् तुम्हीं काय म्हणतां ?

**प्रभास**—मला कुठं आहे स्वतःचं मत. मी झालों आहें सर्वस्वी तुझ्या आधीन. तूं बोलावंस आणि मी तसं चालावं—तूं नुसतं पाहावंस माझ्याकडे नि मी जिवंत राहावं—तूं सूत्रधार नि मी तुझ्या हातचं कळसुत्री बाहुलं—

**मणि**—हें प्रेम नव्हे वाटतं ?

**प्रभास**—नव्हे.

**मणि**—तर काय ? मदनबाधा ?

**प्रभास**—छेः मुळींच नव्हे.

**मणि**—तर काय ?

**प्रभास**—त्याचाच विचार करतों आहें. अजून ठरत नाहीं कांहींच. विचारलं पाहिजे कुणाला तरी—या तुझ्या प्रकाशला एकदां विचारीन म्हणतों—

**मणि**—त्या बिचाऱ्याला त्यांत कांहींच कळायचं नाहीं. तो अगदीं जातिवंत नोकर आहे.

**प्रभास**—असं ? प्रेम कळत नाहीं त्याला ? पशूच आहे म्हणायचा.

**मणि**—प्रेम कळत नाहीं तो पशू का ?

**प्रभास**—नाहीं तर काय !

**मणि**—तुम्हांला कळतं का प्रेम ?

**प्रभास**—तुला काय वाटतं ?

**मणि**—मला वाटतं, तुम्हीं अट्टल प्रेमळ आहांत—

**प्रभास**—अट्टल दारुड्यासारखा—

**मणि**—तें उदाहरण नाहीं लावायचं—

**प्रभास**—आणि प्रकाश ? त्याला एकदां प्रेम शिकव ना !

**मणि**—भलतंच !

**प्रभास**—कां ? आपली कांहीं हरकत नाहीं. आपलं प्रेम निर्मळ असलं, कीं तिथं मत्सराचा संपर्क सुद्धां लागत नाहीं.

**मणि**—त्याची जात आहे पिरोजची. कर्तव्यापुढं त्याला प्रेमाची कदर नाहीं.

**प्रभास**—झिडकारलंन् वाटतं कुणि त्याला ?

**मणि**—योगच आला नाहीं तसा.

**प्रभास**—म्हणूनच म्हणतों, एकदां प्रयत्न करून पहा—

**मणि**—पहा हं—अशानं मी रुसून जाईन निघून.

**प्रभास**—हं—हं—जरा आस्ते—तो पहा कुणी पाहात राहिला आहे आमच्याकडे.

**मणि**—खरंच की ! ( ती चटकन् उभी राहाते. तो हात धरून तिला बसवतो )

**प्रभास**—जगाची आपल्याला काय पर्वा ! कुणाची चोरी आहे ? तूं खूष आहेस, मी खूष आहें; तुझे बाबा बोलायचे नाहींत—माझ्या बाबांची कबुली आहे; मग भ्यायचं कुणाला ? जगाची कसली लाज ? पाहातील ना ? पाहा कीं म्हणावं ! नाटकं नाहीं पाहात ? खोटं बनावट नाटक पैसे देऊन पाहातात त्यापेक्षां हे ज्वलन्त सत्य पहा म्हणावं.

**मणि**—ताळच सोडला तुम्हीं.

**प्रभास**—मी बेतालच आहें. तालाची पर्वा तुला वाटते—गातेस कीं नाहीं तूं ?—खरंच, बाबांना गाऊन दाखवतेस तसंच माझ्यासाठीं म्हण कीं एक गाणं. दारुबंदीचं नको हं !—तो हैदोसदुल्ला नाहीं मला आवडत ! हं म्हण—( तो आग्रह करतो—ती हळूहळू गाऊं लागते. गाणें संपत असतां एका बाजूनें पिरोज येते—त्यांना पाहून थबकते. तीं रंगलीं आहेत असें पाहून निघून जात असतां पडदा पडतो )

---

## प्रवेश दुसरा

[ तळघरांतील बार—रचना बहुतेक पहिल्या अंकांतील दुकानासारखीच आहे. काउंटर मात्र नाहीं—बैठका चहाच्या दुकानासारख्या—दरवाजा कुठेंच दिसत नाहीं—ज्यावेळीं दरवाजा उघडतो तो कळीनें—वरच्या बाजूनें उतरायला किंवा चढायला एका कोपऱ्यांत लहानसा जिना आहे. पण तो कुठवर पोचला आहे हें दिसत नाहीं. आरंभीं फक्त दोन तीन वेटर भांडीं साफ करतांना दिसतात, तितक्यांत वेटर येतो. ]

**वेटर**—काय रे, कुणी आलं नाहीं अजून. मोठी सावधगिरी ठेवा हं. आवाज करूं नका कसलाच. नाहींतर बाटल्या ग्लासं खळखळावित बसाल. हंः! ग्लासाच्या तालावर नाचायचे दिवस गेले!—तोंड लपवून दिवस काढावे लागताहेत आतां. किती दिवस चालणार ही आंधळी कोशिंबिर?—ऐकलंत, कान अगदीं तिखट ठेवा. पासाशिवाय आतां कुणालाच आंत घ्यायचं नाहीं. बाहेरचा पहारेकरी विश्वासू आहे म्हणा. रोजचा परवल बदलला आहे. आजचा परवल मिळाला ना? ठीक. जा, आतां आपल्या कामाला लागा. थांब—आजचे दर कळले आहेत ना? वाढवले आहेत ना बरोबर?—लेखी—तोंडी बोलायचं नाहीं. नुसतं कार्ड दाखवायचं. अं! हा कोण नवा आलाय् आज?

**दुसरा**—मालकांनीं पाठवलंय् मला.

**वेटर**—कानांत सांग परवल. ( तो कानांत सांगतो ) ठीक. लाग आपल्या कामाला. हं—डॉक्टर आले आहेत? होय? ठीक. नि आंतली खोली? चांगली उतरल्याशिवाय कुणाला जाऊं द्यायचं नाहीं इथनं! आधीं जास्त देऊंच नको कुणाला? कुणी जास्त मागूं लागला तर स्वच्छ नाहीं म्हणून सांग. दया माया—आपली ( खिशाला हात लावून ) कीं त्याची मुळींच करायची नाहीं. अगदीं कठोर बनलं पाहिजे. बखोटीला धरून बाहेर काढला पाहिजे—समजलं? अगदीं बखोटीला धरून! लहान मोठा—श्रीमंत गरीब—कांहीं पाहायचं नाहीं. इथं सारे समान आहेत. पैशाची लालूच दाखवतील—भरीला पडायचं नाहीं बरं. क्षणाच्या फायद्यासाठीं कायमचं अन्न गमावाल! तुमचं—आमचं—सर्वांचंच. राक्षस आहे तो—दयामाया करायचा नाहीं. परवां त्या होर्मसजीला काय शिक्षा दिली कळलं? सात वर्षं—सात वर्षं बरं? खूनाच्या जोडीला येऊन

बसला आहे हा गुन्हा!—मानेवर सुरी कशी तळपतेय्! असं वाटतं, नको हा खटाटोप—(मालक वरून येतो—दुसरे वेटर दूर जातात) आजपर्यंत तरी ठीक आहे!

**मालक**—रोजचा दिवस मोजित राहायचं! कसा मेटाकुटीला आलाय् जीव! असं वाटतं, सारं बंद करून स्वस्थ बसावं—

**वेटर**—पण अभिमान?

**मालक**—अभिमान!—कशाचा हा अभिमान? कसला? धंद्याचा? जगांत काय दुसरा धंदाच नाहीं?—नाहीं रे बेट्या, अभिमानासाठीं कोण एवढा मरतोय्! बँक अकौंट पाहिलास आपला?—नि माझाही?

**वेटर**—माझा अकौंट मी पहात नाहीं, पाहिला तर घरीं बसायची बुद्धि होईल मला. नुसतं काम सुरू ठेवतों आहे—

**मालक**—शहाणा आहेस! आधाशी नाहींस माझ्यासारखा! रोज आंकडे पाहात असतों मी—दुप्पट झाली कीं चौपाटीचा हव्यास उत्पन्न होतो!—किती दिवस चालणार आहे हें? रोज डोळ्यांत जीव धरून रहावं लागतं. तिकडे त्या राक्षसाशीं संबंध—प्रत्येक शब्द जपून बोलावा लागतो. हा दोन्ही बाजूचा ताल संभाळतांना जीव कसा रडकुंडीला येतोय्!—त्यांतून तो एक नवा टारझन आलाय्. अशी भीती वाटतेय् त्याची. किती जणांना त्यानं तुरुंगांत पाठवलं आजपर्यंत! आजवर ठीक होतं. कोण कुठं जाणार हें कारभारी या नात्यानं मला कळत होतं—पण आतां सारेच अधिकार त्याला देऊन टाकले आहेत, त्याची भीति पडली आहे मला.

**वेटर**—त्याची काळजी नको. माझ्या माणसांनीं चांगली पाळथ ठेवली आहे त्याच्यावर. छायेसारखे राहातात त्याच्यामागं. माणसंही तशीं नेकीचीं आहेत. त्यांना चारलंही आहे चांगलं सढळ हातानं. वेळीं प्रसंगीं तुरुंगांत सुद्धां जायची तयारी आहे त्यांची.

**मालक**—तशींच माणसं आज पाहिजेत आपल्याला. जोपर्यंत उभं राह्यचं आहे तोंपर्यंत खर्ची घालण्यासाठीं दुसरे कुणी तरी पाहिजेत. सध्यां स्वतः खर्ची पडायची सवड नाहीं. कितीजण राहिले आहेत आतां? तेवढ्यांना तरी संभाळलं पाहिजे. मी जातों आतां. तिकडे हजेरी राखली पाहिजे मला. तशीच जरूरी लागली तर फोन करीन तुला—(जाऊं लागतो पुनः मागें फिरून) वरची व्यवस्था ठीक आहे? भंडार भरपूर आहे?

**वेटर**—कालच आला आहे ताजा खजिना. लाखांची कमाई आहे.

**मालक**—आशाळभूतपणा फार वाईट.

**वेटर**—संधि आहे तोपर्यंत साधून घेतलं पाहिजे. हातचा बाण केव्हां निसटेल तें काय सांगतां येतंय् ? ( आंतून घंटा बाजल्याचा आवाज येतो ) झाली वाटतं सुरवात ?

**मालक**—तर मग आतां मला गेलंच पाहिजे. जीव कसा ओढ घेतोय् मागं. जाऊं ?

( आल्या वाटेनें जातो )

( वेटर भिंतीजवळ जातो, कळ दाबतो. दरवाजा उघडतो. एक गृहस्थ येतात. दरवाजा बंद होतो गृहस्थ टेबलाजवळ बसतो, दुसरा वेटर येऊन कार्ड पुढें धरतो. तो बोटानें दाखवतो. सर्व्हिस सुरू होते. पुनः घंटा होते, दरवाजा उघडून वेटर एका ड्रायव्हरला आंत घेतो. ड्रायव्हर त्या गृहस्थासमोर येऊन बसतो )

**१ गृहस्थ**—तूं ?

**ड्रायव्हर**—होय मी.

**१ गृहस्थ**—तिकडे बैस—त्या तिकडे.

**ड्रायव्हर**—कां ?

**१ गृहस्थ**—कां ! मी तुझा धनी ना ? मालक ना ? तूं नोकर आहेस माझा. इथं बसायचा तुझा अधिकार नाहीं. ( ड्रायव्हर हंसतो. वेटर त्याच्या हातीं कार्ड देतो. तो बोटानें दाखवितो. तो जातो ) हंसतोस काय ! तिकडे बैस

**ड्रायव्हर**—इथं धनी मालक भेद नाहीं धनीसाहेब. सारे एका लेव्हलमधें येतात इथं आल्यावर. मालक म्हणून तुमच्याकडून कुणी जास्त पैसे घेत नाहीं—कीं नोकर म्हणून माझ्याकडून कुणी कमी पैसे घेत नाहीं ! मालक म्हणून तुम्हांला दोन पेग जास्त मिळणार नाहींत—कीं नोकर म्हणून माझा रतीब कुणी तोडणार नाहीं. ( वेटर ग्लास घेऊन येतो. ड्रायव्हर पिऊं लागतो )

**१ गृहस्थ**—( वेटर जात असतां त्याला ) बॉय, और एक पेग.

**दु. वेटर**—आतां नाहीं.

**१ गृहस्थ**—( त्याला खूण करीत ) आण ना.

**वेटर**—( पहात असलेला पुढें येऊन ) उठा आतां शेटसाहेब, इथं लांचलुचपत चालायची नाहीं.

**१ गृहस्थ**—असं काय बरं, एकच—अगदीं एकच !

**वेटर**—ऊं हूं !—उठा.

**१ गृहस्थ**—काय समजलास मला ? ओळखलं नाहींस ?

**वेटर**—इथं येणाऱ्या प्रत्येकाला मी ओळखतों. लक्षाधीश आणि भिक्षाधीश—सारे आमच्या लेखीं सारखे आहेत. तुम्ही मालक असाल एकाद्या कारखान्याचे—पण तुमच्या भाग्याचा मालक मी आहें—उठा, निघा.

**१ गृहस्थ**—अन् मी चहाडी केली तर ?

**वेटर**—( नुसता हंसतो ) पुष्कळ झालं ! जा आतां.

( ड्रायव्हर मोठ्यानें हंसतो )

**१ गृहस्थ**—माझ्या ड्रायव्हर समोर माझा पाणउतारा करतोस ? हा तर बसलाच येऊन माझ्या मांडीवर, अन् तूं बसूं पाहतोस माझ्या मानगुटीला ? तूं काय समजलायस ? बेहेत्तर आहे नाहीं मिळाली तर, पण तुझी वर्दी देईन सरकारांत. धुव्वा उडवून टाकीन या दुकानाचा. ( वेटर आणि ड्रायव्हर दोघेही हंसतात.) असं काय करतोस बरं ? पाय पकडतों तुझे. एकच—अगदीं एकच—दुप्पट देतों. अर्धे घाल खिशांत तुझ्या. एकच—अगदीं एकच.

**वेटर**—( दरडावून ) चल उठ. जागा खालीं कर. ( त्याला उठवून दरवाज्याबाहेर घालवतो. )

( वरील संवाद चालत असतां घंटा वाजवून एका मागून एक माणसें येत असतात आणि वेटर लोक दारू देत असतात. एक लठ्ठ पोटाचा भाटया येऊन अगदीं हळूहळू पीत असतो. )

**ड्रायव्हर**—छान झालं. चांगली गुर्मी जिरली लेकाची. पावलोपावलीं मला ठुकरावीत असतो ! तुझ्या पाया पडला माझ्यासमोर. माझ्याच पाया पडला म्हणून समजतों. तूं न् मी काय दोन आहोंत ? मोठी गंमत झाली. आतां पहा कसे पैसे उकळतों त्याच्यापासनं. शिल्लक संपत आली होती अगदीं. आतां हात लावला की खळ्ळ ! हात लावला कीं खळ्ळ ! आतां अभिषेक बंद पडत नाहीं इथला !

**वेटर**—झालं नाहीं अजून ?

**ड्रायव्हर**—आधाशी नाहीं मी त्याच्यासारखा. चमचा चमचा घेतोंय्. तलफ भागली पाहिजे ना. तुम्हीं थोडेच जास्त देणार आहांत !

**वेटर**—चल, लवकर आटप. खोटी नको दुसऱ्यांची.

**ड्रायव्हर**—तेवढं मात्र व्हायचं नाहीं. घाई करायला सांगू नकोस बुवा. एका

पेल्यांत भागवलं पाहिजे ना ? गेले ते दिवस ! आक्खी बाटली खलास करीत होतों एका बैठकींत. बेवडा सोडून ही घेतली म्हणून बरं झालं—नाहींतर आज मरायची पाळी आली असती. मोठ्यांच्या सोबतीचा प्रताप हा—नाहीं तर बेवड्यांतच कुजत राहिलों असतों नि आज उपाशीं मेलों असतों. हें बघ, पाया पडतों, जरा हळूहळू घेऊं दे.

**भाटिया**—ए ! शुः ! जरा इकडे ये. ( वेटर त्याच्याजवळ जातो ) दुसरी नाहीं कसली ?

**वेटर**—कसली दुसरी ?

**भाटिया**—जरा हलकी.

**वेटर**—हलकी म्हणजे भारी होय ? शॅम्पेन ? आहे. ( वेटर कार्ड दाखवतो ) झेपेल ?

**भाटिया**—हं ! आण—जरा सोडा टाक.

**वेटर**—कां ?

**भाटिया**—तब्येत बरी नाहीं आज. हें घेऊन जा.

**ड्रायव्हर**—( भाटियाजवळ येऊन ) मला द्या ना—फुकटच जायची—

**वेटर**—चटकन् संपवून निघून जा पाहूं. ( भाटियापुढलें ग्लास उचलतो आणि जातो. ड्रायव्हर आपल्या जागीं जाऊन बसतो )

**वेटर**—( ग्लास आणून भाटिया पुढें ठेवीत ) किंमतीला गरम असली तरी प्यायला नरम आहे अगदीं.

**ड्रायव्हर**—गंजीवरचा कुत्रा आहेस. स्वतः तरी प्यायलास का ! नाहीं ना ? ओतून टाकली असशील. माझ्या मुखाला तरी लागली असती ! दरिद्री आहेस झालं.

**वेटर**—( प्रत्येकाजवळ जात ) हं ! आस्ते, आस्ते, ग्लास वाजवूं नका.

**भाटिया**—अशी काय लागतीय् ? कांहीं गंमत येत नाहीं. दुसरी आण कसली तरी.

**ड्रायव्हर**—आतां तरी द्याल मला.

( वेटर त्याच्यापुढचें ग्लास उचलून नेतो अन् परत येतो )

**वेटर**—प्रकृति बरी नसली तर घरीं जा.

**भाटिया**—कसा जाऊं ! जीव जळतोय ना आंतून—पेटतोय नुसता. हवीशी वाटते पण घेववत नाहीं अन् घेतली नाहीं तर प्राण कासावीस होतो.

**वेटर**—काय आणूं ?

**भाटिया**—अगदीं थोडी—माइल्डपैकीं—एक चमचा—अन् एवढासा सोडा—समजलं ? बिल भरपूर. त्यांत वांधा नाहीं.

( एक मजूर येतो )

**मजूर**—अरे कोण आहे इथला मालक ?

( बसलेले सारे 'हळू बोल' म्हणून त्याला सांगतात )

**मजूर**—कां हळू बोल ! चोरी आहे कुणाची ?

**वेटर**—हो—सरकारची.

**मजूर**—एवढं जमिनीखालीं भगदाड पाडलंत तरी आवाज जाईल का ऐकायला ?

**वेटर**—इथला कायदा आहे. शक्य तेवढं बोलायचं नाहीं. बोललं तर हळूं बोलायचं—कानगोष्टी करायच्या.

**मजूर**—मग प्यायची कशाला ?

**वेटर**—नुसती तलफ भागवायला !—ओरडायला नव्हे—शिवीगाळ करायला नव्हे—मारामारी करायला नव्हे—

**मजूर**—तर मग प्यायची कशाला ?

**वेटर**—नुसती तलफ भागवायला.

**मजूर**—झिंगल्याशिवाय का तलफ भागते ? झिंगलं पाहिजे—डळमळलं पाहिजे—कोलमडलं पाहिजे—पडलं पाहिजे—धडपडलं पाहिजे—तेव्हां कुठं तलफ भागते. चुकचुक करून पीत बिछान्यांत झोंपून पडायला मी काय पांढरपेशा आहें ? वाऱ्यावरचा पक्षी आहें मी ! तरंगत गेलं पाहिजे पक्षासारखं. पंख हलवीत ! आण बेवडा—आधीं नवटाक आण. फुटाण्याचं डबडं कुठं आहे ?

**वेटर**—बेवडा नाहीं मिळत इथं.

**मजूर**—मग काय मिळतं इथं ? सरबत ? आईसवॉटर ?

**वेटर**—( कार्ड दाखवून ) हें पहा.

**मजूर**—मला नाहीं इंग्रजी समजत.

**वेटर**—( कार्ड उलटून दाखवून ) हें पहा, कुठलं पाहिजे यांतलं ?

**मजूर**—तुला काय वाटलं रे लेका, मी पांढरपेशा आहें ? साहेब आहें ? ही हुस्की आणि बरांडी माझ्या दांतावर मारतोस ? बेवडा पाहिजे मला. राशी,

फेणी, मसाला—कुठलाही आण पण बेवडा आण.

**वेटर**—बेवडा संपला.

**मजूर**—केव्हांपासून ?

**वेटर**—दारुबंदी झाली तेव्हांपासून.

**मजूर**—अन् हे काय चाललंय ?

**वेटर**—( कार्ड दाखवून ) ही हुस्की बरांडी ! दर पाहिलेस ?

**मजूर**—दर तेवढाच देतों—पण बेवडा दे. विडीवाल्याला सिगरेट देतोय लेकाचा. चमचाभर दारू अन् बालदीभर सोडा—तो घ्यावा पांढरपेशानीं—गोऱ्यान् गांवठी साहेबांनीं ! चिमूटभर तंबाखू आणि पसाभर कोबीचीं पानं—तसली सिगारेट नको मला. मला विडी पाहिजे—अगदीं तह्लख. बेवडा, पावशेर, नवटाक, नवटाक नसला तर अर्धा नवटाक तरी—पण अस्सल बेवडा पाहिजे. ( सगळे फिदीफिदी हंसतात ) हंसता काय लेकाच्यो, मी पांढरपेशा का आहें तुमच्यासारखा ? खुर्चीवरून कोचावर, कोचावरून खुर्चीवर ! दहा घंटे गिरणींत अडकून पडावं लागतं. भरार्र भरार्र घरघर सुरूं असते. हा भुसा जातो कापसाचा, नाका तोंडातून. अन् मला म्हणतो हुस्की पी. हुस्की, बरांडी प्यायला मी काय नामर्द आहें ? बेवडा आण—अबीके अबी—बेवडा.

**ड्रायव्हर**—ओढून काढ त्याला बाहेर, बेवडा मागतो लेकाचा !

**मजूर**—कोण ? तूं ? तूं रे कधीं झालास पांढरपेशा ? बेवडा पीत होतास ना आमच्याबरोबर ? आतां श्रीमंताचा चक्रपाणी झालास, शेट लोकांच्या मांडीला मांडी लावून बसूं लागलास, म्हणून बेवडयाची ओळख विसरलास ? मूळ विसरूं नये—बाबा—मूळ विसरूं नये. ध्यानांत ठेव, शेट लोकांच्य मांडीला मांडी लावलीस तरी मूळचा तूं कुणबट.

**भाटिया**—खरं आहे. आगगाडींत सुद्धां बसतात सगळे लोक मांडीला मांडी लावून. म्हणून कांहीं श्रीमंत गरीब होत नाहीं नि गरीब श्रीमंत होत नाहीं.

**ड्रायव्हर**—पण तुम्हा श्रीमंतांचा श्रीमंती जीव आमच्याच हातीं असतो ना ! एक ठोकर मारली तर स्वर्गाची वाट दिसेल.

**मजूर**—हो दोघांनाही. मृत्यूच्या दारीं कुणी गरीब नाहीं नि श्रीमंत नाहीं तसंच इथं आहे म्हणून वाटलं होतं मला. पण इथं हुस्की आहे—बेवडा नाहीं ना ? ( वेटर मानेनें नाहीं म्हणतो ) श्रीमंताची सोय करतात सारे. एवढा कायदा केला, दारू बंदी केली, पण ज्यांच्या खिशांत खुळखुळतंय तो पितोच आहे कीं ! रुप-

याच्या जागीं पंचवीस रुपये गेले तर त्याची कदर आहे कुणाला ! कुणाच्या बापाचा पैसा ! रक्त सांडतंय आमचं आणि लठ्ठ होताहेत हे. दोन पायाच्या जळवाच जशा कांहीं डसल्यायत् आम्हां लोकांना. तुंबडी भरल्याशिवाय सुटायच्या नाहींत. आणि हे चोर ?

**वेटर**—कोण, आम्ही ? आम्हीं चोर ?

**मजूर**—नुसते चोरच काय दरोडेखोर ! जमिनींत भुयारं खणून हुस्कीच्या थेंबा-गणिक पैशाच्या खाणी खणतांच आहांत कीं ! हंसतोस ? तुरुंगांत गेलास म्हणजे नाहीं हंसायचास.

**भाटिया**—गडबड बंद कर. प्यायची नसली तर जा इथून निघून.

**मजूर**—तूं मालक आहेस वाटतं इथला ?

**भाटिया**—मी कोण वाटेल तो असेन, तुला त्याच्याशीं काय करायचंय् ?

**वेटर**—गप्प बसा दोघेही.

**मजूर**—तुला द्यायचाय कीं नाहीं बेवडा मला ?

**वेटर**—इथं बेवडा नाहीं. बेवडयाला बंदी आहे इथं. तुला माहीत नाहीं मूर्खा, बेवडा इथं होतो—ही विलायतेंतून येते. हा विलायती कारभार चाललाय इथं—देशीला इथं वाव नाहीं.

**ड्रायव्हर**—ऐकलंस बेटया, इथं देशीला वाव नाहीं.

**भाटिया**—हात धरून खेंचून काढ पाहूं या दोघांना. सुखानं पिऊं सुद्धां देत नाहींत—

**मजूर**—पण तुम्ही कुठं आम्हांला सुखानं अन्न खाऊं देतां ?

**भाटिया**—गप्प बैस.

**मजूर**—( अस्तन्या सारून ) तूं कोण रे मला दरडावणार ?

**वेटर**—हं हं !—वाट धर पाहूं आपली. कुणी पाठवलं तुला इथं ?

**मजूर**—त्या हेड जॉबरनं फसवलं मला. तो पितो हुस्की. मोठया शेटचा प्यारा आहे ना तो ? त्याला वाटलं, तो तसाच मी—प्राण गेला तरी हुस्की पिणार नाहीं. बेवडा नाहीं मिळाला तर तस्सा तडफडत राहीन—लाव, बेवडा लाव.

( वेटर त्याला धरून दरवाज्याकडे नेतो. तो दंगा करूं लागतो. भाटिया पुढें सरसावतो, मजूर त्याला एक गुद्दा मारतांच भाटिया कोलमडून पडतो. सगळे मोठमोठयानें हंसतात. भाटिया अस्तन्या सरसावून मजूराच्या अंगावर चालून जातो आहे

तोंच वेटर मधें येतो. ड्रायव्हर वेटरला मागें ओढतो. भाटियाचा गुद्दा ड्रायव्हरला बसतो, ड्रायव्हर त्याच्या आंगावर चिडून जातो. भाटिया पिछेहाट घेतो. त्यासरशीं मजूर शीट मारतो. बाहेरून एकदम शिट्याच शिट्या ऐकूं येतात. मोठमोठ्यानें घंटा वाजूं लागतात. सगळे घाबरून जातात. त्या धांदलींत वेटर नाहींसा होतो. दरवाजा ठोठावल्याचें ऐकूं येतें. मजूर दरवाजा उघडतो आणि पोलिस भराभर आंत शिरतात. घाबरून गेलेल्या बाकीच्या वेटरना पोलिस पकडतात. एका कोपऱ्यांतील दरवाज्यांतून पिस्तुलें रोखलेले मवाली बाहेर येतात. फैरी झडूं लागतात. भाटिया घाबरून इकडे तिकडे पळत असतो. पोलिस मवाल्यांना पकडतात. भाटिया घाबरून मवाल्यांना मिठी मारतो म्हणून त्यांना पकडतां येतें. पुन्हां बाहेर शिट्या होतात. मजूर दरवाजा उघडतो आणि पिरोज आणि मणि स्वयंसेविकांसह प्रवेश करतात. )

**पिरोज**—न्या सर्वांना पकडून—देणारे, पीणारे, नि मारामारी करणारे—सर्वांनाच चौकीवर घेऊन चला.

**भाटिया**—अरे बाई, मला कां उगीच ? मी कांहीं प्यायलों सुद्धां नाहीं.

**पिरोज**—पण आला होतास ना इथं ?

**भाटिया**—तें खरं—पण घरीं पोरंबाळं वाट पाहात असतील माझी.

**पिरोज**—न्या याला. ( शिपाई त्याला धरून नेतात. वेटरनांही नेत असतात. )

**मजूर**—थांबा. त्या वेटरला नेऊं नका.

**पिरोज**—कां ?

**मजूर**—तो माझा माणूस आहे. ( दुसऱ्या वेटरला सोडवून घेतो. इतर जातात ) याचा उपयोग आहे कॅप्टन. याला माहिती आहे इथली.

**पिरोज**—असं ? ठीक. तुम्ही आज उत्तम कामगिरी बजावलीत. गिरणींतल्या मजुराचं खरं खरं नांव राखलंत. आतां झडती घ्या सारी. हा वेटर जागा दाखविल—हेही ( मजुराला ) येतील तुमच्याबरोबर. डोळ्यांत तेल घालून जपून राहा. कुठून कसा हल्ला होईल सांगतां यायचं नाहीं.

( मणि खेरीज सर्व निरनिराळीं दारें उघडून जातात. खालील भाषण चाललें असतां, पेट्या, खोके गोळा करून बाहेर नेले जात आहेत. )

**पिरोज**—सर्वांतला मोठा सांठा आज हातीं लागला. किती दिवस पाळथ ठेवली होती पण नक्की पत्ता लागत नव्हता. आज या मजुरानं मोठी शिताफी केली. किती दिवस हें असं चालणार ?

**मणि**—कुणी सांगावं ? अमेरिकेचं उदाहरण आहे ना डोळ्यांसमोर ?—

**पिरोज**—त्याचीच भीती वाटते. काय उपाय करावा याला ? तसाच कांहीं उपाय झाल्याशिवाय सारे कायदे वायां जातील. जन्मभर अशी पाळथ ठेवीतच का मरायचं ?

**मणि**—श्रीमंती आहे तोंवर दारुबाजी अशीच राहाणार. जमिनींत तोंड खुपसून का असेना—पण राहाणार यांत शंका नाहीं. पैसे आहेत त्यांच्याकडे—विलायतवाल्यांचा पाठिंबा आहे. त्यांचा मुख्य व्यापार आहे ना तो ? अमेरिकेवर कुऱ्हाड घालणारे तरी तेच ना ?—ते स्वस्थ बसणार नाहींत नि आमचे दारुडेही त्यांना सामिल झाल्यावांचून राहणार नाहींत.

**पिरोज**—नायनाट कुणाचा करायचा ? दारुड्यांचा कीं पैसेवाल्यांचा ? कुणाला म्हणून संभाळीत राहायचं ?—बाबांचं काय होणार ?—कसे अगदीं वेडेपिसे झाले आहेत बाबा. रोज नवे नवे बूटलेगर सांपडताहेत, रोज त्यांना तुरुंगांत पाठवताहेत नि रोज पुनः नवे—कीं कुणाला ठाऊक जुनेच !—रोज सांपडताहेत. काय होणार ? पुढं काय होणार ?

**मणि**—त्याची काळजी आपल्याला कशाला ? आपण आपलं काम करीत राहूंया.

**पिरोज**—त्याची काळजी मी करीत नाहीं मणि, मी बाबांची काळजी करतें आहें. बाबांनी काय करायचं याचा विचार करतें आहें. आमची ड्यूटी आम्हीं करतों आहोंत त्या स्वयंसेविका म्हणून. मला कसलीच फिकीर वाटत नाहीं—मी तळमळतें आहे ती दिवाणांची मुलगी म्हणून—त्यांची रक्षणकर्ती म्हणून ! कसं हे आवरणार ? कोण यांचा नायनाट करणार ?

**मजूर**—( येऊन ) सारा माल गोळा करून चौकीवर पाठवून दिला. कोनान्‌कोपरा धुंडाळून माल बाहेर काढला. खूप बेगमी केली होती बेटयांनीं—लाखांची कमाई बुडाली त्यांची.

**मणि**—पण किती कुटुंब सुखी होतील ?

**पिरोज**—वाईट वाटतं तें एवढंच, कीं हे पैसे पाण्यांत जाणार. श्रीमंतांच्या खिशांतून निघालेला कां असेना पण हा पैसा ह्या दरिद्री हिंदुस्थानचा होता—विलायतेला जाऊन यापूर्वीच पोंचला होता. इथं तो कुणाच्याच अंगीं लागला नाहीं याचंच मला दुःख होतं. जाऊं दे, कुणी नाहीं ना आंत ? लपूनछपून बसलेला कुणी असायचा.

**मजूर**—त्या वेटरनं साऱ्या जागा दाखवल्या आम्हांला. तिथं तरी कोण नव्हतं खास.

**पिरोज**—साऱ्या स्वयंसेविकांना घेऊन जा आतां. दिवाण येईपर्यंत मला इथं पाहारा दिला पाहिजे.

**मजूर**—एकट्या राहाणार तुम्हीं इथं ?

**पिरोज**—ही आहे ना ?

**मजूर**—पण तुम्ही दोघीही—( थांबतो )

**पिरोज**—बायकाच ! असंच ना म्हणायचं आहे तुम्हांला ? जा आतां. दिवाणांना वर्दी द्या फोनवरून. इन्स्पेक्टरनाही कळवा. जा. ( मजूर मुजरा करून जातो. ) हीं खरी माणसं ! नोकर नाहींत, ताबेदार नाहींत—हुकमाचे बंदे—गुलाम नाहींत—हे लोक प्रमाणिकपणें काम करताहेत—कां ?—त्यांना पटलं, कीं दारुबंदीनं त्यांचं कल्याण झालं—त्यांच्या घरांतून समाधान नांदूं लागलं—पोराबाळांचीं तोंडं उजळलीं—मूठपसा धान्य शिल्लक राहूं लागलं घरांतून. आणि यांना आम्हीं हलके म्हणतों ! नि मोठे कोण ? हे भुयारांतलीं बारं चालवताहेत हे ! हा अन्याय आधीं मोडला पाहिजे.

**माणि**—कोण मोडणार ?

**पिरोज**—ज्यांना पटेल ते. दारुबंदी पटली म्हणूनच ना हे मजूर मदत करताहेत सरकारला ?—आतां आम्हांला पटलं पाहिजे हें ! आम्हीं हा अन्याय दूर केला पाहिजे. ( घंटा वाजते. दरवाजा उघडून दिवाण, प्रकाश आणि शिपाई येतात. )

**दिवाण**—शाबास !

**पिरोज**—शाबासकी त्या मजुराला द्यायची. आम्हीं नुसती शिपाईगिरी केली.

**दिवाण**—मला वाटतं ही जागा शेवटचीच.

**पिरोज**—कुणी सांगावं ?

**दिवाण**—किती संशयी आहेस !

**पिरोज**—जोखीम आहे माझ्यावर.

**दिवाण**—मला कांहीं फिकीरच नाहीं ?

**पिरोज**—असं मी कुठं म्हटलं ?

**दिवाण**—ठीक. प्रकाश, काय रिपोर्ट दिला त्यानं ?

**प्रकाश**—माझं समाधान नाहीं झालं. जो मिळाला पाहिजे होता, तोच तेवढा सांपडला नाहीं. नोकर चाकर पकडले, माल जप्त केला, पीणारे पकडले पण पाजणारा फरारी आहे तोंवर मला समाधान वाटायचं नाहीं. ( शिपायांना ) कामाला लागा.

**पिरोज**—तें सारं झालं आहे. कांहीं सुद्धां राहिलं नाहीं इथं.

**दिवाण**—सुरुंगाची तयारी आहे ?—तपास बस्स झाला. आतां बाहेर चला नि द्या भुयार उडवून एकदम ! मागमूस सुद्धां राहातां नये या जाग्याचा ! असले कुणी लपलेले तर जातील सुरुंगाबरोबर उडून !

**मणि**—अगबाई !

**पिरोज**—मन कठोर केलं पाहिजे मणि. ही लढाई आहे. लाखांच्या कल्याणासाठीं चारदोन खर्ची पडले तर त्याची कसली खंत बाळगायची ?

**प्रकाश**—( दचकून ) आवाज झाला कसला ?—नाहीं ऐकला कुणी ?—पाहा रे पाहा नीट ? ( शिपाई पाहूं लागतात ).

**दिवाण**—संशय नुसता ! किती घाबरट आहांत प्रकाश ?

**पिरोज**—काय करायचं आहे इथं राहून ?

**दिवाण**—खात्री करून घ्यायची आहे मला !

**पिरोज**—म्हणजे तुम्हांलाही संशय आहे ?

**दिवाण**—संशय नाहीं—माझी खात्री आहे. माझी खात्री आहे, कीं विषाचं बीज अजून दबा धरून राहिलं आहे. बीमोड झाला पाहिजे त्या बीजाचा. लहानसं—एवढंसं बीज जरी शिल्लक राहिलं तरी त्यांतून मोठा वृक्ष फुटून उठेल. नाहीं—माझं समाधान व्हायचं नाहीं. सुरुंग लावला तर ते मरून जातील—जिवंत सांपडले पाहिजेत ते कुणि असले तर !—प्रकाश, झडती घ्या.—

**प्रकाश**—इथं काय आहे ?

**पिरोज**—सारं सामसूम आहे इथं !

**दिवाण**—नाहीं—तपास करा—तपास करा म्हणतों ना ! ( स्वतः भिंती ठोठावूं लागतो. ) मजूर कुठं आहे तो ? आतां आणा इथं त्याला—अन् त्या वेटरलाही ! जातीनं झडती घेणार मी ! ( सारेच ठोठावतात. पिरोज आणि मणि पाहात राहातात )

**मणि**—फार चवताळले आहेत साहेब ! कां ?

**पिरोज**—आवाज झाला खरा कसलासा !

( तें तपासित असतां त्याची पाठ फिरल्यावेळीं फट्कन एक चोर दरवाजा उघडून एक मवाली पिस्तुल रोखून येतो—पिरोज व मणि धांवतात. पिरोज 'बाबा' म्हणून किंचाळते आणि त्या मवाल्याच्या अंगावर धांवून जात त्याला धक्की देत आहे तोंच

तो गोळी झाडतो. दिवाण परतून पाहातो. शिपाई त्याला पकडतात—एक शिपाई गोळी लागून पडतो—दिवाण व प्रकाश पुढें येतात )

**दिवाण**—पैशासाठीं पत्करलंस हें काम ?

**मवाली**—नाहीं.

**दिवाण**—तर मग ?

**मवाली**—दारूसाठीं.

**दिवाण**—असं ? काय वाटलं तुला ? मला मारलं, कीं दारू सुरू होईल ? ( शिपायांना ) सोडा रे त्याला. एकटाच आहेस ?—बोल—आणखी कुणी जोडीदार आहे ? नाहीं ?—कुणी दारू दिली तुला ? कुणी दिलं तुला हें काम ?

**मवाली**—दारूनं.

**दिवाण**—सरळ सांग.

**मवाली**—दारू देणारानं.

**दिवाण**—कोण तो ?

**मवाली**—दारू देतो तो.

**दिवाण**—कोण तो ? काय त्याचं नांव ?

**मवाली**—मला माहित नाहीं.

**दिवाण**—तुझी त्याची गांठ कशी पडली ?

**मवाली**—इतरांसारखीच—इतरांबरोबर—

**दिवाण**—रोज येतोस इथं ?

**मवाली**—जी.

**दिवाण**—पिस्तुल घेऊन ? नाहीं ? मग आजच कां आणलंस हें ?

**मवाली**—आजच दिलं त्यानं. त्याला कळलं—पूर्वीचा माझा धंदाच होता तो !

**दिवाण**—आणखीन् कोण आहेत ?

**मवाली**—सारे पकडले गेले—मी निसटलों.

**दिवाण**—सोडा रे त्याला.

**प्रकाश**—हें काय दिवाणसाहेब ?

**दिवाण**—तुम्हीं आहांत ना इथं ? घेरून राहा—पळूं देऊं नका. हं—सोडा आतां.

**पिरोज**—बाबा !—

**दिवाण**—गप्प बैस !—सोडा त्याला—( शिपाई त्याला सोडतात ) कुठं आहे

तें पिस्तुल. ठीक. दे इकडे—( मवाल्याला ) हें घे—घे हातांत ! पाहातोस काय ? घे हें पिस्तुल. असा समोर ये—हात कांपतो तुझा ?—मघाशीं कुठं नाहीं कांपला ?—धर नेम !—

**मवाली**—कुठं ?

**दिवाण**—( छातीला हात लावून ) इथं.

**पिरोज**—बाबा !

**दिवाण**—गप्प बैस ! ( मवाल्याला ) इथं नेम धर.

**पिरोज**—प्रकाश, पकडा त्याला. खेंचा मागं.

**दिवाण**—प्रकाश, पकडा हिला—खेंचा मागं. इथं मी दिवाण आहें—मी असतांना हुकुम करायचा अधिकार दुसऱ्या कुणाला नाहीं. ( मवाल्याला ) चल ये असा समोर—धर नेम आणि ओढ घोडा. बावळट ! भीतोस ? तुला मारायचं आहे ना मला ? हा मी इथं उभा आहें—तुला हुकूम करतों आहें—गोळी झाड ! गरिबगुरिबांना कशाला मारतोस ? तुमचा राग आहे तो माझ्यावर ना ?—मग हा मी इथं आहें—समोर गोळी झाडतां येत नाहीं ?—आडून मारली पाहिजे ?—ही पहा मी पाठ फिरवली—झाड आतां गोळी !—मीं पडेपर्यंत—ठार मरेपर्यंत गोळ्या झाड. कुणी नाही करणार तुला अडथळा. व्हा रे दूर—दूर—दूर—गोळी लागून मी मरेपर्यंत कुणी यायचं नाहीं पुढं—(थांबून पुनः फिरून पहातो ) अजून हात कांपतो तुझा ?—चल, हात उचल—उचल—धर नेम—मी मेलों कीं दारू-बंदी उठेल असं वाटतं ना तुला ?—मग झाड गोळी ! भोळ्या माणसा, कुणी ही तुझी फसवणूक केली ? दारूबंदी कुणी केली ? मी का ?—तूं जसा तुझ्या दारूवाल्याचा ताबेदार तसाच मी!—हुकमाचा ताबेदार ! साऱ्या हिंदुस्थाननं मला हुकुम केला—तो हिंदुस्थानचा हुकूम मी पाळतों आहें. मी मेलों कीं हिंदुस्थान मरत नाहीं. मी मेलों तर दुसरा कुणी येईल—बिनीचा शिपाई पडला तर मागलं प्यादं पुढं सरकतं—तसाच कुणी तरी येईल. मी जिवंत असतांना जें होणं कठीण गेलं, तें मी मेलों तर सुलभ होईल. विरोध करणार देखील जागे होतील. माझ्या सांडल्या रक्तानं त्यांच्या डोळ्यावरचा पडदा धुऊन निघेल. पाहातोस काय ? झाड गोळी !—माझ्या रक्ताचा सडा या दारूच्या भुयारांत पडला तर इथले दगडधोंडे देखील खडबडून जागे होतील. ( त्याच्या हातांतलें पिस्तुल गळून पडतें ) धंदेवाला मवाली ना तूं ? तूं असा

घाबरतोस ? उचल तें पिस्तूल ! काय वाटलं तुला ? तुझी परीक्षा पाहातों असं वाटलं ? नाहीं—मला मरायचं आहे—याच कार्यासाठीं वैऱ्याच्या हातून मरायचं आहे. त्या माझ्या मरणानंच हें कार्य यशस्वी होईल—त्या माझ्या मरणानंच विरोधाचं बीज नाहींसं होईल—त्या माझ्या मरणानंच दारूबंदीच्या मार्गातले कांटे नाहींसे होतील. जित्या वाचेनं बोललेलं ज्यांना पटलं नाहीं ते मी मेल्यावर माझ्या भाषेनं बोलूं लागतील. मला खात्री आहे—मला आत्मविश्वास आहे—ही जरब नव्हे—नाटकी देखावा नव्हे—तुझ्या हृदयाला भिडण्यासाठीं—तुला थंड पाडण्यासाठीं टाकलेला हा डाव नव्हे—दोस्त, खरोखरच मला मरायचं आहे—दारूबंदीसाठीं मरायचं आहे—हा पहा, मी तयार आहें—उचल—उचल तें पिस्तूल—धर नेम—हं—कापूं नकोस !—हं, ठेव बोट घोडयावर ! हं ! हें पहा, मी डोळे सुद्धां मिटले नाहींत. उघडया डोळ्यांनीं मरायचं आहे मला. मी मेल्यावर जग काय करतं तें दिसलं पाहिजे मला. सोड गोळी—( मवाली स्ततःला गोळी घालून घेतो आणि पडतो ) दगाबाज !—मूर्खा, स्वतःला फसवलंस आणि मलाही फसवलंस !—

( दिवाण बसतो. शिपाई व प्रकाश मवाल्याकडे जातात. पिरोज येऊन दिवाणाला बिलगते. मणिही जवळ येते. )

**दिवाण**—पाहिलंत पोरींनो, दारुबंदीचा विरोध अजून संपला नाहीं. अजून जगाला माझा संदेश पोंचत नाहीं.

( हळुहळु पडदा पडतो )

# अंक चवथा

[ सीन–दुसऱ्या अंका प्रमाणेंच. पडदा वर जातांच वेटर एका बाजूनें व मालक दुसऱ्या बाजूनें प्रवेश करतात. ]

**मालक**—तेव्हांपासून तुझी भेट घेतां आली नाहीं. कुणी नाहींत ना घरांत ? तो प्रसंग टळला—निसटलास म्हणून बरं, नाहींतर त्या पोरीनं तुला पाहिलं असतं–नि पाहिलं असतं तर—

**वेटर**—भरलींच होतीं शंभर वर्षं ! मला प्रश्न पडला आहे तो हाच, कीं हा पत्ता लागला कुणाला ?—कोण होता तो मजूर ?—कधींच पाह्यला नव्हता–त्याचा काय संबंध ? इथं कधींच आला नव्हता—मग हिची नि त्याची गांठ पडली कुठं ?—नि मुख्य प्रश्न असा, कीं आतां तो आहे कुठं ?—

**मालक**—काय करायचं आहे त्याची चौकशी करून. या लोकांना आतां जागा कळली.—जागा हातची गेली— ,

**वेटर**—सुरुंग लावून उडवणार म्हणतांच मी पसार झालों—असा जीव धुगधुगत होता माझा ! म्हटलं, तेंच दार कुणाच्या हातीं लागलं तर ! पण निसटलों—नि सुरुंगही लावला नाहीं कुणी. वाटा बुजवून टाकल्या वाटतं !

**मालक**—आतां तिकडे जाऊं नकोस नि पाहूंही नकोस. आतां दुसरी जागा तयार केली पाहिजे. इथला माल अजून भरपूर आहे. तीन महिन्यांची बेगमी होईल. पुढला माल इतक्यांत यायला झाला आहे—

**वेटर**—मला वाटतं, आतां झालं एवढं पुरे झालं.

**मालक**—थकलास इतक्यांत ? अरे, अजून किती वर्षं काढायचीं आहेत ? किती आंकडे वाढवायचे आहेत ? तूंच थकलास तर मी एकटा काय करणार ?—दोघांच्या पलीकडे तिसरा येतां नये या कारभारांत. नोकर तुझ्या विश्वासांतले असतात—मग कां म्हणून माघार घ्यायची ?

**वेटर**—भीती वाटते मला या पोरीची. कुठला कोण मजूर ?—कांहीं डोकं चालत नाहीं माझं.

**मालक**—भिऊन कसं चालेल. ती भीतेय का ? तो भीतोय् का ?—मग

आम्हींच कां भ्यायचं ? ध्येयावर दृष्टी आहे तो कुणाच्या बापालाही भीत नाहीं. आपलं ध्येय समोर ठेवलं पाहिजे—त्या ध्येयासाठीं झगडलं पाहिजे.

**वेटर**—पुढं काय झालं कांहींच कळत नाहीं मला. इथंही कुणी कांहीं बोलत नाहींत. सामसूम आहे त्या दिवसापासून. तो प्रभास तेवढा बडबडत असतो—पण त्याला कांहींच माहित नाहीं. त्यालासुद्धां मणीनं कांहीं सांगितलं नसावं.

**मालक**—त्याला खूष ठेव. त्याच्या खुषीवर आमचं जीवन आहे. एकाच्या स्वार्थावर हजारांचा चरितार्थ चालणार आहे. हें घर सुटलं, तर माल ठेवायला दुसरी सुरक्षित वखार नाहीं मिळायची! ( दचकून ) कोण आलं ? तो टारझन तर नव्हे—तो कांटा काढून टाकला पाहिजे.

**वेटर**—त्याची नाहीं मला भीती वाटत. ही पोरटीच फार भयंकर आहे—तो राक्षस पत्करेल—पण ही पोरटी—कोण आलं ?—( पाहूं लागतो ) कोण तरी आलंय खास !—

**मालक**—मी जातों तर—( आंत जातो )

( वेटर चोहींकडे पाहातो.—जिन्यावर डोकावून येतो—दारांतून आंत पाहातो. खुर्चीजवळ क्षणभर थांबतो—नि एकदम आल्या दारानें आंत जातो. प्रकाश येतो—दाराकडे पाहात राहातो )

**प्रकाश**—( बाहेरच्या दाराकडे पाहात ) ये ना. कुणी नाहीं इथं.

**मणि**—( प्रवेश करून ) इथं थोडीच चोरी आहे कुणाची ? बॉय् कुठं गेला तो ?

**प्रकाश**—तिकडेच गेले आहेत साहेब. मला वाटतं, पिरोजही तिकडेसच गेली आहे. प्रभास वर आहे वाटतं ? ( वेटर येतो ) प्रभास कुठं आहेत ?

**वेटर**—कुणीच नाहींत घरांत.

**मणि**—पिरोज केव्हांशी बाहेर गेली ?

**वेटर**—मला माहित नाहीं.

**मणि**—दिवाणसाहेब केव्हां आले ?

**वेटर**—तें सांगायचं नाहीं असा हुकूम आहे मला.

**प्रकाश**—आणि कारभारी ?

**वेटर**—कारभारी होय ?—( थांबतो )

**प्रकाश**—हो-हो-कारभारी. त्यांचाही हुकुम आहे वाटतं साहेबांसारखाच ?

**वेटर**—बरोबर ओळखलंत !

**प्रकाश**—बरी नक्कल करतोय् साहेबांची.

**वेटर**—खरं आहे.

**प्रकाश**—अन् तूं कुणाची करतोस नक्कल ?

**वेटर**—तसा कांहीं नमुना नाहीं माझ्यापुढं.

**प्रकाश**—माझी नक्कल करीत जा. हंसतोस काय ?

**वेटर**—कठिण जाईल मला. कारभाऱ्यांची कुवत माझ्या आंगीं नाहीं.

**मणि**—बस ना. वाट पाहिलीच पाहिजे कुणी येईपर्यंत—

**वेटर**—चहा आणूं ? कीं कॉफी ?

**प्रकाश**—संत्र्याचा रस आण ना ?

**वेटर**—जी. ( जातो ).

**मणि**—पिरोज काय म्हणे तें मला आतां कळतंय्. सारं वातावरण कसं भारून गेलंय. जिकडे तिकडे संशय दिसतो. उद्गार येतात पण तोंडावाटे बाहेर काढायला भीती वाटते. त्या दिवशीं तो प्रकार पाहिला अन् तेव्हांपासून—

**प्रकाश**—हं—पुरे—त्याचा उल्लेख नाहीं करायचा.

**मणि**—हा काय रे कोंडमारा ? बोलायचं सुद्धां नाहीं तें ?—

**प्रकाश**—नाहीं.

**मणि**—कां ?

**प्रकाश**—साहेबांसाठीं ! कुणाला नाहीं खरं वाटायचं ! उगीच गैरसमज पसरायचे मात्र. सध्याची वेळ मोठी आणीबाणीची आहे. एवढा सुद्धां गैरसमज होतां नये कुणाचा ?

**मणि**—मग आतां बोलूं काय ?

**प्रकाश**—कांहींचं बोलूं नकोस. बोलल्याशिवाय स्वस्थ बसायला शिकलं पाहिजे. तो एक योग आहे—मोठा कठिण योग आहे. असे अद्वितीय प्रकार घडतात तेव्हांच जिभ ताब्यांत ठेवावी लागते—

**मणि**—पिरोज कशी आली नाहीं अजून ?

**प्रकाश**—तुझं लक्ष नाहीं माझ्या बोलण्याकडे—

**मणि**—नाहीं.

**प्रकाश**—कां ?

**मणि**—मला नको तो उपदेश ऐकायला—मला नाहीं ती सवय !

**प्रकाश**—ती सवय केली पाहिजे. ( वेटर रसाचा ग्लास व चहा घेऊन येतो.

दोघांपुढें एक टी पॉय आणून ठेवून त्यावर ठेवतो व उभा राहतो ) जा, तूं. ( वेटर जी म्हणून जातो. प्रकाश ग्लास हातांत घेऊन बोलूं लागतो ) वाटतं आहे, कीं हे दुव्वे शेवटचे आहेत—पण कुणी सांगावं—( तो पेला ओंठाजवळ नेतो )

**मणि**—ठेव तो पेला खालीं.

**प्रकाश**—कां ?

**मणि**—त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिलं होतंस ? मूर्तिमंत राक्षसी मुद्रा दिसत होती त्याची. मला भीतीच वाटली. कुणी सांगावं—कदाचित्—

**प्रकाश**—बॉय—बॉय—( वेटर येतो ) घेऊन जा हें.

**वेटर**—कां ? जमलं नाहीं ? दुसरं आणूं ?

**प्रकाश**—नको—कांहींच नको. या रंगाचीच चीड आहे मला.

**वेटर**—नि हा चहा ?

**प्रकाश**—तोही ने—कांहीं नको आतां. ( वेटर भांडीं घेऊन जातो ) खरोखरच कांहीं नको आतां. ( Pause ) कां ? स्वस्थशी बसलीस ?

**मणि**—बोलायचं नाहीं ना ? जें बोलावंसं वाटतं तेंच जर बोलायचं नाहीं मग उगीच कां तोंडाला शीण द्या ?

**प्रकाश**—ज्यावेळीं महत्त्वाची गोष्ट बोलायची नसते, त्याचवेळीं वायफळ बडबड करावी लागते. मुकाट बसणं मोठं संशयास्पद असतं.

**मणि**—मला नकोत ते डावपेंच !

**प्रकाश**—दारुबंदी निश्चित व्हायला हवी ना ? होय ना ? मग हे डावपेंच वगळून चालायचं नाहीं. ( Pause वेटर येतो. )

**वेटर**—मला हांक मारलीत ? ( प्रकाश त्याच्याकडे नुसता पाहात राहातो ) मला हाक मारलीत ?

**प्रकाश**—होय. ( वेटर दचकतो ) अजून कुणीच कां येत नाहींत ?—कारभारी भेटले असते तर त्यांना निरोप सांगून गेलों असतों. मला दुसरं काम आहे—शिवाय हिला घरीं पोंचवायची आहे. ( कांहीं न बोलतां वेटर दुसऱ्या दारानें जातो ) ( मणिला ) पाहिलंस त्याच्या तोंडाकडे ?

**मणि**—चल—आतां जाऊं. पुन्हा येऊं पाहिजे तर—मला भीती वाटूं लागली इथं.

**प्रकाश**—जरा थांब. कारभारी येऊं देत.

**मणि**—अन् ते नसलेच घरांत तर ?

**प्रकाश**—तो गेला नसता—हं—थांब—( मालक येतो ) या–फार वेळ झाला मला. आतां वाट किती पाहायची ? साहेबांना एवढंच सांगायचं, कीं एक मोठा सांठा सांपडला आहे—अगदीं हाताशीं आहे—तो काबिज करायच्या तयारीनं आतांच येतों.

**मालक**—आत्तां येतील साहेब. जरा थांबा ना !

**मणि**—नको चल जाऊं—

**प्रकाश**—बरं आहे. येतों मी. साहेबांना सांगा. ( दोघे जातात. मालक येरझाऱ्या घालतो. वेटर येतो. )

**मालक**—ऐकलंस ?

**वेटर**—हो.

**मालक**—मग ?

**वेटर**—दुसरा असेल कुठला !

**मालक**—मग इथं येतों, कशाला म्हणाला तो ?

**वेटर**—साहेबांना न्यायला—नित्याप्रमाणें—

**मालक**—मला नाहीं वाटत !

**वेटर**—हंः—खोटी भीती ! कोण सांगणार त्याला ?

**मालक**—आजवर कुणी सांगितलं त्याला ?

**वेटर**—तें बाहेरचं—

**मालक**—हो—तें खरं आहे. वाट पाहूं म्हणतोस ?

**वेटर**—आणीबाणीच्या वेळेची तयारी आहे. तसं वाटलं, कीं—

**मालक**—ठीक. जा तूं—

**वेटर**—चांगली नजर ठेवा. माझी पंचाईत होते केव्हां केव्हां. चहापाणी द्यावं लागतं ना ?—तेवढा क्षणदेखील कुणी दृष्टीआड होता कामा नये. ( वेटर जातो. पिरोज येते. )

**पिरोज**—कोण आलं होतं इथं ?

**मालक**—होय. इन्स्पेक्टर प्रकाश नि मणिबेन.

**पिरोज**—केव्हां गेले ?

**मालक**—हे आतांच. वाटेवर नाहीं भेटले ?

**पिरोज**—कांहीं निरोप ?

**मालक**—साहेबांसाठीं—

**पिरोज**—ठीक. जा. ( मालक जातो. ती इकडे तिकडे पाहात असते तों वेटर येतो )

**वेटर**—चहा आणूं ?

**पिरोज**—नको. किती वेळ होतीं इथं तीं ?

**वेटर**—कोण ?

**पिरोज**—प्रकाश नि मणि ?

**वेटर**—बराच वेळ—दहा—पंधरा मिनिटं—कदाचित् कमी असतील—किंवा जास्तही असतील—

**पिरोज**—मी वर आहें म्हणून सांग कुणी आलं तर. ( जिन्याकडे जाते. वेटर तिच्याकडे पाहात असतो—ती वर जाऊन दिसेनाशी होईपर्यंत पाहात राहातो व नंतर बाहेरच्या दरवाजांत डोकावतो आणि दचकून मागें सरतो—प्रकाश प्रवेश करतो. )

**प्रकाश**—पिरोजबाई आल्या ?

( वेटर नुसता होकार देऊन जिन्याकडे जातो. तोंच वरून ' कोण आहे ? ' म्हणून पिरोज विचारते. वेटर ' इन्स्पेक्टर साहेब ' असें ओरडून सांगतो तेव्हां पिरोज धांवत खालीं येऊं लागते-अगदीं शेवटच्या पायऱ्यांवर येतांना सावकाश येते. वेटर जातो. )

**पिरोज**—( प्रकाशला ) काय आहे ?

**प्रकाश**—कांहीं विशेष नाहीं.

**पिरोज**—त्या दिवशीं तुम्ही आधीं नव्हतां ?—कोण तो मजूर ?

**प्रकाश**—कुठला मजूर ?

**पिरोज**—मला ज्यानं ती जागा दाखवली तो ?—मोठा नेकीचा माणुस दिसला. पहिल्यानं मला संशय आला होता—पण धीर केला, गेलें नि काम झालं. पण त्यानंतर त्याचा मुळींच पत्ता नाहीं. आला नाहीं, भेटला नाहीं, कीं बक्षिसाची मागणी केली नाहीं.

**प्रकाश**—अशींच आहेत तीं माणसं. त्यांचा अंत लागायचा नाहीं—किती तरी आहेत असे. एकाकाळीं ते दारूडे होते—दारूबंदीनं फायदा झाला हें त्यांना पटलं, म्हणूनच आतां हीं कामं करताहेत. दारूचा नायनाट करतील तर एका काळचे हे दारुबाज मजूरच.

**पिरोज**—त्या दिवशींची आठवण झाली कीं अंगावर शाहारे येतात ! केवढं धाडस तें ?—( शहारून ) अन् त्यानं गोळी झाडली असती तर !

**प्रकाश**—यालाच म्हणतात आत्मविश्वास !

**पिरोज**—नव्हे—तुम्हाला कळलं नाहीं. खरंच त्यांना तसं वाटतं. तसंच म्हणतात ते पुनः पुनः ! म्हणूनच मला भीती वाटते.

**प्रकाश**—नकोत त्या गोष्टी !

**पिरोज**—कां ?—भीति वाटते ?

**प्रकाश**—नाहीं. त्या गोष्टी बोलायची जागा ही नव्हे.

**पिरोज**—विसरतां ! हें आमचं घर आहे.

**प्रकाश**—( पुटपुटत ) कुणी सांगावं !

**पिरोज**—म्हणजे ?

**प्रकाश**—( अगदीं हळू ) थोडा धीर धरा—थोडाच वेळ—सोक्षमोक्ष व्हायची वेळ अगदीं जवळ आली आहे—( वेटर इकडून तिकडे जातो ) पहा !

**पिरोज**—पुरे झालं हें ! आतां बाबांना सांगितल्याखेरीज गत्यंतर नाहीं. हीं माणसं गेलींच पाहिजेत इथून !—अजून कसे बाबा आले नाहींत ? हें असं झालं आहे अलीकडे—जरा वेळ झाला, कीं माझा जीव कसा कासावीस होतो.—

**प्रकाश**—साहजिक आहे !—पण हें त्यांनीं ध्यानीं घेतलं पाहिजे.

**पिरोज**—त्यांना कुठं आहे आमची आठवण ? आपल्याला एक मुलगी आहे—एक मुलगा आहे, हें प्रत्यक्ष पाहून सुद्धां त्यांच्या ध्यानीं राहात नाहीं. हें असं एकटं घर—दादा तसा भटकत फिरतो—म्हणूनच वाटतं, घरीं येऊं सुद्धां नये—सारा दिवस पाखरासारखं भिरभिर करीत बाहेर हिंडावं—रात्रीं आपलं यावं घरट्यांत !—पण जीव राहात नाहीं—कोण त्यांची काळजी घेईल ? ( प्रकाश येतो ) आणि हा एक ! याला संभाळावं लागतं ना ? ( प्रभासच्या पाठोपाठ मणि येते ) अं ! तूं आलीस ? यांनीं तुला घरीं पोंचवलं होतं ना ?

**प्रभास**—मीच आणली तिला बरोबर—ती कुठं येत होती ?—गर्व झालाय् तुम्हां पोरींना ! दारूबंदी चालवली आहे ना ? अन् यश येतंय् तें बायकांना—पुरुषांना नव्हे !—हंः—कांहीं व्यत्यय आला नाहीं ना आमच्या येण्यामुळं ?

**पिरोज**—कसला व्यत्यय यायचा ? काय असायचं असं गुपित ?

**प्रभास**—नाहीं—म्हटलं तुमचीं कांहीं राजकारणं चाललीं असतील ! हो—

मी तसला भलता संशय नाहीं बरं घ्यायचा ! दुसरा कुणी असता तर त्यानं तसाच कांहीं आरोप केला असता—पण तुम्हीं राजकारणी माणसं—सर्वस्वी कार्याला वाहून घेतलेलीं, तेव्हां—

**पिरोज**—दादा, आतां जाशील ?—मणि, तूं जा पाहूं घरीं—

**प्रभास**—एवढंसुद्धां पाहावत नाहीं ? या तुमच्या राजकारणामुळं आमचं लग्न पडलं आहे अडून—नुसतं क्षणभर आम्हीं एका जागीं बसूं सुद्धां नये तोंवर ?

**प्रकाश**—साहेब आले नाहींत अजून ?

**प्रभास**—चल मणि, आपण जाऊं घरांत—सध्यां तुला नाहीं ना कांहीं राजकारण ? ही मला कांहींच सांगत नाहीं—तूं सांग चल ती हकिकत !—

**पिरोज**—कसली हकिकत ? ( तिला उत्तर न देतां प्रभास मणीला ओढून नेतो. ) हें असं चाललं आहे ! कुणाला सांगूं ? कोण आहे जिव्हाळ्याचं ?

**प्रकाश**—मला सांगा ना ! ( पिरोज दचकून पाहात ) मी नुसतं ऐकेन—उत्तर देणार नाहीं—विचारल्याशिवाय कांहींच बोलणार नाहीं. ( pause ) हा कोंडमारा फार वाईट ! अंतःकरणांतल्या उद्वेगानं हृदयाला जे पाझर फुटतात त्यांना कुठं तरी पाट फोडावा लागतो.—माफ करा, सहज मनांत आलं तें बोललों—

**पिरोज**—खरं आहे—पण माझा नाइलाज आहे. एकटंच मेलं पाहिजे मला ! परवांपासून माझ्या हृदयानं ठाव सोडला आहे. तत्त्वाच्या प्रस्थापनेसाठीं दिव्य करण्याचा अविचार जर बाबांनीं केला, तर—तर मलाही तसंच करावं लागेल.

**प्रकाश**—तो अविचार होईल का ?

**पिरोज**—मलाही तोच प्रश्न पडला आहे. ( Long pause )

**पिरोज**—बाबा कसे येत नाहींत अजून ? ( वेटर येतो ) ..

**वेटर**—जी ! काय पाहिजे.

**पिरोज**—( क्षणभर त्याच्याकडे पाहून ) दादाला कांहीं चहा कॉफी हवी असली तर पहा !—

**वेटर**—इथं काय आणूं ?

**पिरोज**—कांहीं नको—( वेटर जातो ) असा पाळथ ठेवतो आहे ! कां ? कां ? ? कां ? ? ?—जीव कसा कावून जातो !

**प्रकाश**—( हळूच ) जरा धीर धरा !—कांहीं विचार करूं नका. विचार करण्यानं नुसता त्रास होतो मात्र !

पिरोज—कां हें असं उदासवाणं वाटतं मला ? भावी संकटाचीं ही पूर्व चिन्हं तर नाहींत ?

प्रकाश—शांततेपूर्वीचं वादळ आहे हें !

पिरोज—ही आपली मनाची समजूत करायची ! एकदां असं वाटतं—( मालक येतो ) काय आहे ?

मालक—फोन आला आहे साहेबांना ?

पिरोज—कुणाचा ? ( असें म्हणत उत्तराची अपेक्षा न करतां निघून जाते )

मालक—साहेब येईपर्यंत थांबणार आहांत ?

प्रकाश—हो !—कां ?

मालक—नाहीं, सहज विचारलं !—मला सांगण्याजोगं नाहीं कांहीं ?

प्रकाश—माफ करा—मला तसा हुकूम नाहीं.

मालक—कुणाचा हा अविश्वास ? साहेबांचा कीं तुमचा ?

प्रकाश—तें मी कसं सांगूं ! मी हुकुमाचा ताबेदार आहें.

मालक—कुठं सांपडला आहे हा सांठा ?

प्रकाश—अगदीं हाताजवळ आहे.

मालक—असं ? हाताजवळ म्हणजे कुठं ?

प्रकाश—तें सांगण्यापेक्षां दाखवूनच देणार आहें.

मालक—केव्हां ?

प्रकाश—वेळ येईल तेव्हां !

मालक—मी कांहीं मदत करूं शकेन ?

प्रकाश—कांहीं सांगतां येत नाहीं—( पिरोज येते ) कोण होतं ?

पिरोज—कुणीच नाहीं—कुणी बोललंसं वाटलं, पण एकदम बंद झालं बोलणं. अन् कोण काय बोललं तें मुळींच समजलं नाहीं.

मालक—मलाही नांव सांगेना कुणी.

प्रकाश—हें चालायचंच. टेलिफोन आहे तिथं हे चावटपणा चालायचेच !

मालक—त्या दिवशीं साहेबांनीं मोठंच दिव्य केलं !

पिरोज—कुणी सांगितलं तुम्हांला ?

मालक—एका शिपायानं.

पिरोज—कुठं भेटला तो तुम्हांला ?

मालक—कामासाठीं आला होता.

**प्रकाश**—अबकारी शिपाई ? होय ? काय त्याचा नंबर ?

**मालक**—मी पाहिला नाहीं त्याचा नंबर.

**प्रकाश**—कां ?

**मालक**—काय जरूर होती ?

**प्रकाश**—असं ? अबकारी शिपाई तुमच्याकडे कां आला ?

**मालक**—त्याच खात्यांत मी आहें ना ?

**प्रकाश**—पण काम कोणतं ?

**मालक**—तें विचारण्याचा अधिकार साहेबांचा आहे.

**पिरोज**—मी विचारतें—कां आला होता तो ?

**मालक**—तें विचारण्याचा अधिकार साहेबांचा आहे. ( जाऊं लागतो )

**पिरोज**—थांबा—( मालक जातो )—हंः ! हा दुसरा नमुना !

**प्रकाश**—माझा अंदाज घ्यायचा होता त्याला.

**पिरोज**—आतां कमाल झाली !—काय होईल तें होवो—आज बाबांना सांगणार, हा माणूस इथून गेलाच पाहिजे.

**प्रकाश**—माझी एक विनंती आहे—

**पिरोज**—काय ?

**प्रकाश**—आजचा दिवस थांबा—उद्यां तो आपोआपच जाईल—( वेटर येतो ) काय आहे ?

**वेटर**—मणिबेन बोलावताहेत ताईसाहेबांना—

**पिरोज**—आलें हं—थांबा—( जाते )

**प्रकाश**—( वेटर जाऊं लागतो त्याला ) बॉय्—जरा इकडे ये—

**वेटर**—जी—

**पिरोज**—कुणीं अबकारी शिपाई आला होता इथं ?

**वेटर**—हो—कारभारीसाहेबांकडे.

**प्रकाश**—कोण तो ?

**वेटर**—माझ्या ओळखीचा नाहीं—( प्रभास-आंतून ' बॉय ' म्हणून ओरडतो ) आलों साहेब—( म्हणत जातो )

( प्रकाश कांहीं वेळ मुकाट्यानं बसतो. मालक मागून येऊन पाहून जातो. लगेच एक मवाली सुरी घेऊन त्याच दारानं येतो—प्रकाशजवळ येणार तोंच प्रकाश उलटून त्याचा हात धरतो आणि मुरगळतो. तो खालीं पडतो )

**प्रकाश**—( त्याच्या छातीवर बसून ) बोल—कुणी तुला पाठवलं ?—कुणी पाठवलं ? ( तो तोंड उघडून दाखवतो ) जिभ नाहीं ?—मुका आहेस ? लिहितां येतं ?—नाहीं ?—ऊठ—( मवाली उठतो ) हात पुढं कर—वर कर हात—तसाच राहा—( खिशांतलें पिस्तुल काढून रोखतो व शिटी वाजवतो. मालक, वेटर, प्रभास, मणि, पिरोज व नोकर येतात ) पकडा याला.

**प्रभास**— कोण हा ?
**मणि**— काय झालं ?
**पिरोज**— घट्ट धरून ठेवा त्याला ?
**मालक**— कोण रे तूं ?

**पिरोज**—कुठून आला हा ?—कसा आला ?—कुठून आलास ? ( तो तोंड उघडून दाखवतो. )

**प्रकाश**—मुका आहे तो !

**प्रभास**—मुकाट्यानं आला होय ?—कुणावर चालवित होतास सुरी ?

**प्रकाश**—माझ्यावर.

**पिरोज**—मुका आहे ?—शाबास !—मोठे कल्पक आहेत हे लोक !—इथं कोण आहे तुझ्या ओळखीचा !—( तो नाहीं म्हणून मान हालवतो ) मग कसा आलास ?—कुणी शिपाई नव्हते का पाहाऱ्यावर ?—(दिवाण येतो) बाबा !

**दिवाण**—काय आहे गडबड ?

**प्रकाश**—मी इथं एकटाच होतों आपली वाट पाहात. मागल्या बाजूनं येऊन यानं सुरा उगारला—मी पकडलं त्याला—तो मुका आहे—

**दिवाण**—द्या त्याला पोलिसच्या ताब्यांत—( त्याला घेऊन जातात )—कुठून आला तो ?

**प्रकाश**—तें कळलं नाहीं—पण या दोन्हीं दारांनीं आला नाहीं एवढं खरं.

**दिवाण**—मागनं आला ?

**प्रकाश**—असं वाटतं.

**दिवाण**—( मालकाला ) तुम्हीं कुठं होतां ?

**मालक**—आंत—ऑफिसांत—

**पिरोज**—बाबा—( प्रकाश तिला डोळा घालतो. थांबते. )

**दिवाण**—काय ?

**पिरोज**—आंतून कसा येईल तो ?

**दिवाण**—मारेकरी कधीं सरळ वाटेनं येत असतात? ठीक—जा तुम्हीं. ( मालक, वेटर जातात ) आज स्टेशनवर कोण गेलं होतं पिरोज ?

**पिरोज**—मी.

**दिवाण**—अन् मणि ?

**मणि**—माझा सुट्टीचा दिवस आहे आज.

**दिवाण**—म्हणून हिंडत होतीस याच्याबरोबर ?

**प्रभास**—छेः—ती इथंच आली होती—प्रकाशबरोबर. मी आणली तिला पुनः घराकडून.

**दिवाण**—असं ?—( हंसतो )

**प्रभास**—हसूं नका. पुरे झालं आतां. हिला बडतर्फ करा पोलिसांतून. इथं भर दिवसा घरांत मारेकरी शिरूं लागले—इथंच कर म्हणावं पोलिसकी—

**दिवाण**—थोडे दिवस राहिले—नुकतं कुठं निश्चित झाल्यासारखं वाटतंय् मला. एकदां एवढी खात्री झाली, कीं बायकांची पलटणच मोडून टाकतों—

**प्रभास**—( सुस्कारून ) शेवटीं असं कुवार राहून मरावं लागणार मला !

**पिरोज**—असं म्हणावं भोळ्याभाबड्यांनीं. पूर्ण दारुबंदी होणं इतकं का अशक्य आहे ?

**दिवाण**—कर्तबगाराला या जगांत कांहींच अशक्य नाहीं. तुला काय वाटतं मणि ?

**मणि**—पूर्ण दारूबंदी झाल्याशिवाय मी केव्हांही संसारांत पडणार नाहीं.

**दिवाण**—शाबास !

**प्रभास**—हाय रे दैवा !

**पिरोज**—काय नाटकं करतो आहेस ?

**प्रभास**—नाहीं ग पोरी, तुम्हां लोकांइतका मी आशाळभूत नाहीं !

**दिवाण**—तुम्हांला काय वाटतं प्रकाश ?

**प्रकाश**—मी शिपाई आहें—भविष्यकालांत डोकावायचा प्रयत्न करतो त्याच्या हातून शिपाईगिरी होणार नाहीं.

**दिवाण**— } शाबास !
**पिरोज**— } शाबास !

**दिवाण**—थांबा प्रकाश. आज इथंच जेवून जा. आज मणिही आली आहे—

**प्रभास**—होऊन जाऊं द्या आमचं केळवण !—

[ दिवाण हंसतो—मणिची पाठ थोपटतो आणि माडीवर जातो ]

**प्रभास**—घरांत मोरेकरी शिरणं जसं कांहीं यांच्या अंगवळणीच पडलं आहे! आहे कांहीं कुणाची खातरजमा? आतां इथं खून पडला असता!—तर हे मेजवानी द्यायच्या गोष्टी बोलताहेत!—

**पिरोज**—अन् तूं केळवण करायला सांगितलंस तें?

**प्रभास**—त्यांचाच मुलगा ना मी?—पण माझी गोष्ट निराळी आहे. या प्रकाशला काय वाटेल?—

**प्रकाश**—मी साहेबांना ओळखतों!

**मणि**—चला—आतां आंतच बसूं.

**प्रकाश**—मला इथंच राह्यलं पाहिजे.

**प्रभास**—कां? मरायचं ठरवलंय् वाटतं? जो उठला तो मरायच्या गोष्टी बोलतोय्. बोलणं सोपं आहे—सगळेच कांहीं बाबा नसतात—

**प्रकाश**—माफ करा—उगीच गैरसमज करून घेऊं नका.

**प्रभास**—ठीक आहे—चल मणि—चल पिरोज—

**पिरोज**—मीही इथंच थांबणार आहें—

**प्रभास**—काय म्हटलंस?

**पिरोज**—ऐकूं नाहीं आलं? जा तुम्ही. मी येत नाहीं.

**प्रभास**—चल मणि, आपल्याला तरी हीं कोण कुठं यायला हवीं होतीं? अं? आपण तिकडे बसूं—तशींच हीं दोघं इथं बसतील!—चल—

**मणि**—तशींच?

**प्रभास**—हो-हो-तशींच. चल (दोघें जातात.)

**पिरोज**—दादाचं बोलणं मनावर घेऊं नका.

**प्रकाश**—सध्यां दुसरा कसला विचार करायला मला अवसर नाहीं. काय करूं? कशी मुस्कटदाबी झालीय् माझी. जें सांगावं म्हणून आलों तें सांगायचा धीर झाला नाहीं—नव्हे, सांगूं नये असंच वाटलं. तो कारभारी—जाऊंद्या—सांगितलं त्यानं तर पाहातां येईल. उगीच त्याला निरोप सांगितला असं आतां वाटूं लागलंय्!

**पिरोज**—काय निरोप सांगितला?

**प्रकाश**—एक सांठा सांपडला आहे म्हणून.—एकदां वाटतं तेवढयावरूनच तो संशय घेईल—

**पिरोज**—कसला संशय?

**दिवाण**—मारेकरी कधीं सरळ वाटेनं येत असतात ? ठीक—जा तुम्हीं. ( मालक, वेटर जातात ) आज स्टेशनवर कोण गेलं होतं पिरोज ?

**पिरोज**—मी.

**दिवाण**—अन् मणि ?

**मणि**—माझा सुट्टीचा दिवस आहे आज.

**दिवाण**—म्हणून हिंडत होतीस याच्याबरोबर ?

**प्रभास**—छेः—ती इथंच आली होती—प्रकाशबरोबर. मी आणली तिला पुनः घराकडून.

**दिवाण**—असं ?—( हंसतो )

**प्रभास**—हसूं नका. पुरे झालं आतां. हिला बडतर्फ करा पोलिसांतून. इथं भर दिवसा घरांत मारेकरी शिरूं लागले—इथंच कर म्हणावं पोलिसकी—

**दिवाण**—थोडे दिवस राहिले—नुकतं कुठं निश्चित झाल्यासारखं वाटतंय् मला. एकदां एवढी खात्री झाली, कीं बायकांची पलटणच मोडून टाकतों—

**प्रभास**—( सुस्कारून ) शेवटीं असं कुवार राहून मरावं लागणार मला !

**पिरोज**—असं म्हणावं भोळ्याभाबड्यांनीं. पूर्ण दारुबंदी होणं इतकं का अशक्य आहे ?

**दिवाण**—कर्तबगाराला या जगांत कांहींच अशक्य नाहीं. तुला काय वाटतं मणि ?

**मणि**—पूर्ण दारूबंदी झाल्याशिवाय मी केव्हांही संसारांत पडणार नाहीं.

**दिवाण**—शाबास !

**प्रभास**—हाय रे दैवा !

**पिरोज**—काय नाटकं करतो आहेस ?

**प्रभास**—नाहीं ग पोरी, तुम्हां लोकांइतका मी आशाळभूत नाहीं !

**दिवाण**—तुम्हांला काय वाटतं प्रकाश ?

**प्रकाश**—मी शिपाई आहें—भविष्यकालांत डोकावायचा प्रयत्न करतो त्याच्या हातून शिपाईगिरी होणार नाहीं.

**दिवाण**— } शाबास !
**पिरोज**— } शाबास !

**दिवाण**—थांबा प्रकाश. आज इथंच जेवून जा. आज मणिही आली आहे—

**प्रभास**—होऊन जाऊं द्या आमचं केळवण !—

[ दिवाण हंसतो—मणिची पाठ थोपटतो आणि माडीवर जातो ]

**प्रभास**—घरांत मारेकरी शिरणं जसं कांहीं यांच्या अंगवळणीच पडलं आहे ! आहे कांहीं कुणाची खातरजमा ? आतां इथं खून पडला असता !—तर हे मेजवानी द्यायच्या गोष्टी बोलताहेत !—

**पिरोज**—अन् तूं केळवण करायला सांगितलंस तें ?

**प्रभास**—त्यांचाच मुलगा ना मी ?—पण माझी गोष्ट निराळी आहे. या प्रकाशला काय वाटेल ?—

**प्रकाश**—मी साहेबांना ओळखतों !

**मणि**—चला—आतां आंतच बसूं.

**प्रकाश**—मला इथंच राह्यलं पाहिजे.

**प्रभास**—कां ? मरायचं ठरवलंय् वाटतं ? जो उठला तो मरायच्या गोष्टी बोलतोय्. बोलणं सोपं आहे—सगळेच कांहीं बाबा नसतात—

**प्रकाश**—माफ करा—उगीच गैरसमज करून घेऊं नका.

**प्रभास**—ठीक आहे—चल मणि—चल पिरोज—

**पिरोज**—मीही इथंच थांबणार आहें—

**प्रभास**—काय म्हटलंस ?

**पिरोज**—ऐकूं नाहीं आलं ? जा तुम्ही. मी येत नाहीं.

**प्रभास**—चल मणि, आपल्याला तरी हीं कोण कुठं यायला हवीं होतीं ? अं ? आपण तिकडे बसूं—तशींच हीं दोघं इथं बसतील !—चल—

**मणि**—तशींच ?

**प्रभास**—हो–हो–तशींच. चल ( दोघें जातात. )

**पिरोज**—दादाचं बोलणं मनावर घेऊं नका.

**प्रकाश**—सध्यां दुसरा कसला विचार करायला मला अवसर नाहीं. काय करूं ? कशी मुस्कटदाबी झालीय् माझी. जें सांगावं म्हणून आलों तें सांगायचा धीर झाला नाहीं—नव्हे, सांगूं नये असंच वाटलं. तो कारभारी—जाऊंद्या—सांगितलं त्यानं तर पाहातां येईल. उगीच त्याला निरोप सांगितला असं आतां वाटूं लागलंय् !

**पिरोज**—काय निरोप सांगितला ?

**प्रकाश**—एक सांठा सांपडला आहे म्हणून.—एकदां वाटतं तेवढयावरूनच तो संशय घेईल—

**पिरोज**—कसला संशय ?

**प्रकाश**—कांहीं नको आतां इथं—नकोच—थांबा न् पहा काय होतं तें. आजचा दिवस मोठा आणीबाणीचा आहे. टाकलेले डाव जर बरोबर जुळले तर—मोठाच कांटा दूर होईल—पण जरा कांहीं चुकलं—

**पिरोज**—कांहीं नाहीं चुकायचं. मन निधडं केलं पाहिजे—अगदी घट्ट केलं पाहिजे पोलादासारखं. आम्हां बायकांना बरं जमतं तें. तुम्हीं पुरुष फार अधिरे असतां. पुढं काय होईल याचा विचार करीत बसतां, म्हणून तुमची फसगत होते. कां हसलांत ?—खरं आहे, दुसऱ्याला उपदेश करणं सोपं असतं. नाहीं ?—मी उपदेश करीत नाहीं. मी जो अनुभव घेतला आहे त्याची चुणुक देतें आहें तुम्हांला ! केवढा कोंडमारा होतोय् माझा ! पण माझा तोल सुटला मनावरचा तर सारा डोलारा कोसळून पडेल. किती अवधानं सांभाळावीं लागताहेत मला, याची तुम्हाला कल्पना नाहीं. नकोच यायला ती कल्पना ! माझं दिव्य मला पुरेसं आहे—त्यांत बाबांना सुद्धां मी वाटेकरी केलं नाहीं. मोठं कठीण जातं आहे—कोंडलेला श्वास कुठं तरी सोडावा असं वाटतं—असं वाटतं खरं, पण कुठं सोडूं हा श्वास ? असं वाटतं, हा श्वास सोडतांना प्राण जायचा पट्कन् !—नको—नकोच !—

**प्रकाश**—( क्षणभर स्तब्धतेनंतर ) निश्वास सोडायला माणसाला एकादं स्थान हवं—नको म्हणून चालत नाहीं. एकटेपणा फार वाईट—अभिमान असतो एकटेपणांत. एकहाती लढाई झुंजण्यांत मोठी कर्तबगारी असते—पण अशावेळीं एकादी ढाल तरी पाहिजे—सारेच वार आंगावर घेणं मोठं वाईट. थकवा येतां कामा नये. सारखं लढत राह्यलं पाहिजे—न थकतां वार केले पाहिजेत नि सोसलेही पाहिजेत.—म्हणून ढाल हवी.

**पिरोज**—( पुटपुटत ) ढाल हवी !—बचावासाठीं ?—कशाला हवी ढाल ?

**प्रकाश**—विसाव्यासाठीं—बचावासाठीं नव्हे.

**पिरोज**—विसाव्यासाठीं ! केव्हां मिळणार हा विसावा ?—केव्हां ? केव्हां ??—
( आंतून मणि गात असल्याचें ऐकूं येतें. तिकडे प्रकाश आणि पिरोज यांचें लक्ष एकदम वेधलं जातं. तीं दोघं क्षणभर स्तब्ध राहून ऐकत असतात. पण हा विक्षेप ध्यानीं येऊन पिरोज पुनः बोलूं लागते. तिकडे आंत मणीचें गायन सुरूच असतं. )

**पिरोज**—स्वतःचा संसार विसरून माणूस जेव्हां जगाच्या संसाराला हात घालतो तेव्हां त्यानं विसाव्याची अपेक्षाच करूं नये, असं बाबा वारंवार म्हणत असतात.

मला तें खरं वाटतं—मनाला सुद्धां पटतं—पण कां कोण जाणे, प्रत्यक्ष जीवनांत या उपदेशानं अधाशी मनाची फसवणूक होत नाहीं.—काय म्हटलं मीं ? फसवणूक का ?—समजूत होत नाहीं, असं म्हणायचं होतं मला !—

**प्रकाश**—किती सुंदर आहे मणीचा आवाज !—काय म्हणते आहे ती ?—मी नव्हतं ऐकलं तिचं हें गाणं !

**पिरोज**—( सुस्कारा टाकून ) गाण्याकडे लक्ष होतं वाटतं ?

**प्रकाश**—वेड आहे मला गाण्याचं—

**पिरोज**—दारूवाल्यांना कळलं नाहीं वाटतं ? बरं साधन होईल त्यांना हें !—तुम्हांला चकवायला—

**प्रकाश**—माफ करा. चूक झाली माझी. वृत्तीला आळा केव्हां घालावा लागतो हें मी क्षणभर विसरलों होतों—

( गाणं जवळ जवळ ऐकूं येतें. प्रभास व मणि एकमेकांना कवटाळून गात बाहेर येतात—त्यांना पाहतांच पिरोज चटकन् प्रकाशचा हात घट्ट दाबून धरते—तें त्याच्या ध्यानीं येतं पण तो तिकडे दुर्लक्ष करतो. दोघं एकत असतात. मागल्या बाजूने वेटर येऊन पाहातो आणि मालकाच्या खोलीकडे जातो. तीं दोघं गात गात पिरोजजवळ येतात. )

**प्रभास**—ऐक पिरोज—

**पिरोज**—ऐकतें आहे—

**प्रभास**—( तिच्या हाताकडे पाहून ) अस्सं !

**पिरोज**—काय ? ( चटकन् भानावर येऊन हात सोडते )

**प्रभास**—हात कां सोडलास ? ही मी मणीला अशी कवटाळली आहे. तुम्ही समोर दिसलां म्हणून मी दूर लोटली का तिला ?

**पिरोज**—थांबलीस कां मणि ? गा ना.

**मणि**—तुला आवडलं ?

**पिरोज**—यांना फार आवडलं. तूं गाऊं लागलीस तेव्हां यांना माझं बोलणंसुद्धां ऐकूं येईनासं झालं ! गा ना—

**प्रभास**—हं गा—कर सुरू—अन् मग तूंही पण प्रकाशचा हात घट्ट धरून ठेव—

**पिरोज**—दादा !—

**प्रभास**—परिणाम आहे तो गाण्याचा. मी तुला दोष देत नाहीं. गा ना मणि !

**प्रकाश**—आपला गैरसमज होतो आहे.

**प्रभास**—होय ? मग दूर करा ना तो गैरसमज !

**पिरोज**—माणसासारखं कसं बोलावं हें तुला कधीं कळणार आहे का दादा ?

**प्रभास**—हो—हें माणसासारखंच बोलतों आहें. तूं अतिमानवी होऊं पाहाते आहेस म्हणून माझं माणुसकीचं बोलणं तुला पटत नाहीं. जरा माणसांत ये—असाच कुणाचा तरी हात धरायचा प्रयत्न कर—( पिरोज एकदम निघून जाते ) पाहिलंस मणी, पिरू आतां माणसांत येऊं लागलीय् !

**मणि**—असं बोलणं बरं नाहीं. किती वाईट वाटलं तिला !—थांबा—मी समजूत घालून घेऊन येतें तिला. ( जाते )

**प्रभास**—पाहिलंत ?—बायकांची जात जितकी बायकांकडे ओढते तितकीच पुरुषांची जात आपसांत झगडत राहाते. म्हणूनच या दारुबंदीच्या चळवळींत या बायका पुरुषांवर मात करून राहिल्या आहेत. कशी एकजूट केली आहे त्यानीं !

**प्रकाश**—तेंच पहातों आहे मी !—ती कर्तबगारी आमच्यांत नाहीं म्हणूनच मला दुःख होतं. ( वेटर मालकाच्या खोलींतून येऊन आंत दुसऱ्या बाजूनें जात असतो ) बॉय्, इकडे ये.

**वेटर**—जी.

**प्रकाश**—थोडं सरबत घेऊन ये—घसा कसा कोरडा पडला आहे.

**वेटर**—जी—( जातो )

**प्रकाश**—मोठा नेकीचा माणूस दिसतो. असे नोकर भाग्यानंच मिळतात.

**प्रभास**—तुम्हाला नाहीं मिळत असला नोकर ?

**प्रकाश**—नोकर ठेवण्याचं सामर्थ्य मला अजून आलं नाहीं. ( वेटर येतो ) एकच ? यांना नाहीं आणलंस ?

**प्रभास**—जा दुसरं आण ( वेटर जातो )

**प्रकाश**—अजून समजूत घालून झाली नाहीं वाटतं ?

**प्रभास**—बायका बायका गोळा झाल्या, कीं पुरुषाला तेव्हांच विसरून जातात. बसल्या असतील दोघीं तिथंच बोलत ! हं—तेव्हां काय म्हणत होतों मी—आम्हीं पुरुषांनीं सुद्धां अशी एकजूट केली पाहिजे—( वेटर येतो ) दे—

**प्रकाश**—हें घ्या ना—तें चालेल मला—इतकं नको आहे मला—तें थोडंच दिसतंय !—

**प्रभास**—( चट्कन ग्लास घेऊन तोंडाला लावतो. ) पाहुणचार म्हणजे पाव्हण्याचा घास आपण हिरावून घेणं नव्हे. ( वेटर जाऊं लागतो ) बॉय् , इकडे ये—इथं बैस—आमच्या शेजारीं बैस—हंसतोस काय ? आम्हीं पुरुषांची एकजूट करायची सुरवात करणार आहों. बैस—

**प्रकाश**—खरंच—बैस—आगगाडींत कुठं आपण हे भेद पहातों—( वेटर दचकतो )

**वेटर**—मी गरीब माणूस—

**प्रकाश**—मांडीला मांडी लागली म्हणजे गरीब श्रीमंत होत नाहीं, कीं श्रीमंत गरीब होत नाहीं—

**वेटर**—माफ करा—( एकदम निघून जातो )

**प्रभास**—असा कां गेला तो ?—फार घाबरल्यासारखा दिसला. नाहीं ?

**प्रकाश**—नोकर माणसं—धन्याशेजारीं कशीं बसतील ?

**प्रभास**—मग ही आमची एकजूट होणार कशी ?

**प्रकाश**—तेंच तर कठीण आहे ना ! आतां साहेब आले तर त्यांच्या समोर बसायची सुद्धां मला छाती होणार नाहीं.—मग जवळ बसणं कुठलं ?

**प्रभास**—स्वयंसेवक म्हणून आम्ही काम करीत होतों तेव्हां हे भेदाभेद पाहात नव्हतों—तें आमचं दल मोडलं नि भेद जाणवूं लागले. तें दल या बायकांनीं मोडलं नाही म्हणून त्यांच्यांत एकजूट आहे—पगारी नोकरांत कधीं एकजूट असते ?—कुठं गेल्या या ? पळून तर गेल्या नाहींत ? हंसता काय ? खात्री नाहीं या बायकांची. केव्हां कुणाबरोबर कशा पळून जातील हें सांगतां यायचं नाहीं. या—या त्यांचा तपास करूं—( प्रकाशचा हात धरून त्याला ओढीत नेतो. एक क्षणभर तिथें कुणीच नसतें—नंतर एका बाजूनें वेटर नि दुसऱ्या बाजूनें मालक येतो )

**वेटर**—प्रसंग कठीण आहे !

**मालक**—कसला प्रसंग ?

**वेटर**—हाच तो. शंकाच नाहीं—अगदीं तेंच वाक्य—अगदीं त्याच आवाजांत बोलला—

**मालक**—कुठलं वाक्य ?

**वेटर**—शेठिया बनून आला होता तिकडे—त्या दिवशीं—

**मालक**—त्या दिवशीं ? तळघरांत ? हा ?—घात झाला !—खात्री आहे तुझी ?—

**वेटर**—अगदीं निःसंशय—तोच हा—अगदीं तोच—तेव्हांच म्हणाला—मला वाटतं मुद्दाम म्हणाला, मला ओळख देण्यासाठीं.

**मालक**—ओळख कां देईल तो ?

**वेटर**—तेंच तर मला कळत नाहीं ना !

**मालक**—मग आतां ?

**वेटर**—मला वाटतं, आम्हीं पळून जावं अशी त्याची इच्छा आहे.

**मालक**—असं कसं असेल ?

**वेटर**—शंकाच नाहीं—मुद्दामच त्यानं खूण दिली ही.

**मालक**—उद्देश ?

**वेटर**—बभ्रा होऊं नये. दिवाणांची बेअब्रू नाहीं का व्हायची ?

**मालक**—मग ?

**वेटर**—मग काय ? हं—

**मालक**—पळून जायचं ?

**वेटर**—तर काय करायचं ?

**मालक**—आणि हा इथला माल ?

**वेटर**—कृष्णार्पणमस्तु !

**मालक**—काळजाचा लचका निघतोय् !

**वेटर**—आधाशीपणा बरा नव्हे—हाड घशांत अडकेल !—संधि आहे तोंवर काढता पाय घेणं—( पडद्यांत प्रभास—बॉय्–बॉय्–) चला—तिथं—समजलं ना ?—तिथं—( दोघे दोन बाजूनीं जातात. प्रभास आणि प्रकाश येतात )

**प्रभास**—बॉय !—बॉय् ! !—बॉय् !!! कुठं गेला हा ? पाहिलंत ? तुमची दृष्ट पडली !—

**प्रकाश**—खरं आहे. मला वाटतं—बॉय आतां यायचा नाहीं.

**प्रभास**—कां—बॉय् ! बॉय् !! ( मोठ्यानें ओरडतो )

**प्रकाश**—आधीं खात्री करून घ्या. ( मणि आणि पिरोज येतात. )

**पिरोज**—ओरडायला काय झालं ?

**प्रभास**—बॉय् कुठं आहे ?

**पिरोज**—असेल आंत.

**प्रभास**—मग ओ कां देत नाहीं ? सैंपाकी तरी आहे कां घरांत ? कीं तोही पळाला ?—यांना इथं जेवायला राहून घेतलेले—

**मणि**—म्हणून पळाला कीं काय तो ?

**प्रभास**—हंसतेस काय ? हा गंभीर प्रसंग आहे ! बॉय् ! ! बॉय् ! ! !

**फिरोज**—केवढ्यानं ओरडतोयुस ? बाबा ऐकतील ना ?

**प्रभास**—बॉय्—बॉय्—बॉय् कुठं गेला ?

**फिरोज**—खराच गेला कीं काय तो ?

**प्रकाश**—मी सांगितलं होतं ना ?

**प्रभास**—काय सांगितलं होतं ?

**फिरोज**—कीं बॉय् नि कारभारी आज आपोआप पळून जातील.

**प्रभास**—( ओरडून ) अरे कोण आहे तिथं—चपराशी !—( चपराशी येतो ) कारभारी आहेत का पहा—( चपराशी जातो ) कां जातील ते ?

**मणि**—ते पळून जातील असं यानं सांगितलं तुला ?

**फिरोज**—हो—आश्चर्य आहे !

**प्रभास**—आश्चर्य कसलं—बेअब्रू आहे !

**फिरोज**—कुणाची ? कां ?

**प्रभास**—तुझी—माझी—बाबांची—साऱ्यांची बेअब्रू होईल ते पळून गेले तर—जीव द्यायचा प्रसंग येईल माझ्यावर !

**फिरोज**—तुझ्यावर ? कां ?

**प्रभास**—तुला नाहीं कळायचं तें ! ( प्रकाशचा कोट धरून ) भल्या माणसा, सांग, हे पळून जातील असं तुला कसं कळलं ?—आणखीन् काय काय कळलं ?

**प्रकाश**—मला सारं कांहीं कळलं आहे—( प्रभास मटकन् बसतो ) म्हणूनच मी त्यांना पळून जाऊं दिलं—तुमची बेअब्रू होऊं नये म्हणून.

**प्रभास**—बॉय् पळून जाणार नाहीं—केव्हांही जाणार नाहीं—बॉय् ! ! ! !

( दिवाण येतो. जिन्यावरच उभा राहतो. )

**दिवाण**—काय गडबड आहे ?—( चपराशी येतो )

**चपराशी**—कारभारी नाहींत.

**दिवाण**—कुठं गेले ?

**प्रभास**—पळाले. ( दिवाण खालीं येतो ) होय ना प्रकाश ?

**दिवाण**—प्रकाश, ही काय भानगड आहे ? ( प्रकाश शीट वाजवतो ) प्रकाश, उत्तर द्या—( प्रकाश पुन: शीट देतो ) बस्स ! ही कुठली शिस्त ? मी

विचारतों आहें—

**प्रकाश**—हें त्याचं उत्तर—( स्वयंसेवक आंतून दारूच्या पेट्या आणून ठेवतात. ) हें त्याचं उत्तर!—

**दिवाण**—कसल्या पेटया आहेत या ?—दारू ! ! माझ्या घरांत ?—

**प्रकाश**—होय साहेब.

**दिवाण**—नि मला कळलं नाहीं ?

**प्रकाश**—होय साहेब.

**दिवाण**—मला माहित नाहीं नि तुम्हांला कळलं ?

**प्रकाश**—होय साहेब—

**दिवाण**—कारभारी कुठं आहेत ?

**प्रकाश**—( स्वयंसेवकांना ) जा या पेटया घेऊन. ( स्वयंसेवक पेट्या घेऊन जात असतां दिवाण थांबवून उघडून पाहातो. बाटल्या दिसतात. खुणेनंच 'जा' म्हणतो ते पेटया घेऊन जातात. )

**दिवाण**—एवढा मोठा सांठा—नि तो प्रत्यक्ष माझ्या घरांत ! कारभारी कुठं आहेत ? बॉय्—बाय्—

**प्रभास**—तोही पळून गेला ! एकूण काय, पुरुषांची एकजूट होत नाहीं हेंच खरं !

**दिवाण**—गप्प बैस !

**प्रभास**—ठीक आहे ! मला तेंच हवं आहे. ( जाऊन बाजूला बसतो )

**दिवाण**—( बसतो ) प्रकाश—

**प्रकाश**—( खिशांतून कागद काढून देतो ) हा रिपोर्ट—

( दिवाण वाचूं लागतो—सर्व स्तब्ध असतात—मणि पिरोजला एका बाजूला बोलावते—ती नाकारते—मणि प्रभासकडे जाते, प्रभास उठून दुसरीकडे जाऊन बसतो—मणि घाबरून इकडे तिकडे पाहात—प्रकाश तिला दटावतो—ती स्तब्ध राहात )

**दिवाण**—प्रभास—प्रभास—

**प्रभास**—मला गप्प बसायला सांगितलं होतं !

**दिवाण**—तें तेव्हां—( कागद दाखवून ) आतां नव्हे. बोल.

**प्रभास**—मी पाहूं का ?

**दिवाण**—पहा. ( कागद देतो )—शाबास प्रकाश ! थँक्यू मणि ! अगदीं योग्य माणूस जोडून दिलास मला ! पिरोज, मी आतां निर्धास्त झालों.

**प्रभास**—नाहीं—

**दिवाण**—प्रभास, प्रत्येक बाबतींत मला विरोध करायचा तूं निश्चयच का केला आहेस ?

**प्रभास**—मला पोलिसच्या ताब्यांत द्या—

**मणि**—काय झालं ?—काय केलं तुम्हीं ?—प्रकाश—प्रकाश, हें काय चाललं आहे ?

**दिवाण**—थांब मुली—प्रभास, माझ्या प्रश्नाचं उत्तर दे.

**प्रभास**—काय आहे आपला प्रश्न ?—केव्हांच आपण मला कांहीं विचारलं नाहीं. थांबा, आपण विचारलं नाहीं तरीही मी सांगणार आहें—

**पिरोज**—नाहीं दादा—

**दिवाण**—म्हणजे ? तुला हें माहित आहे ?

**पिरोज**—मला माहित आहे तें हेंच कीं काय, तें अजून मला कळलं नाहीं. प्रकाश, मणीला घेऊन जाल का जरा ?

**प्रभास**—नाहीं—आतां कुणापासूनही मला कांहींच चोरून ठेवायचं नाहीं. मी गुन्हेगार आहें—अगदीं निर्भयपणें सांगतों, कीं मी गुन्हा केला आहे—पण आपली जी कल्पना झाली आहे, तो गुन्हा मात्र मी केला नाहीं. माझ्यापुरता मी गुन्हेगार आहें—पण—

**पिरोज**—प्रकाश, हिला घेऊन जा पाहूं.

**प्रभास**—नाहीं मणि, केव्हां तरी हें कळणार होतंच तिला—आतां निराकरण होतं आहे—ठीक झालं. पिरोज, मी तुझा फार आभारी आहें—आजवर माझ्या गुन्ह्यावर पांघरूण घातलंस—

**दिवाण**—होय पिरोज ?

**पिरोज**—होय बाबा ! ( Pause )

**दिवाण**—माझ्याच दोन्हीं मुलांनीं मला दगा द्यावा ना ? पिरोज, मला वाटलं होतं, तूं प्रामाणिक आहेस—आपल्या बापाइतकीच प्रामाणिक आहेस—

**पिरोज**—होय बाबा—

**दिवाण**—तरीही होय म्हणतेस ?

**पिरोज**—होय बाबा.

**दिवाण**—कॅप्टन पिरोज !

**पिरोज**—होय दिवाणसाहेब.

**दिवाण**—इन्स्पेक्टर प्रकाश, या दोघांना कैद करा.

**प्रभास**—आणि दारूबंदीवर घाला घाला ? कैदेला मी भीत नाहीं दिवाण-साहेब, शिक्षेलाही भीत नाहीं—पण याचा परिणाम काय होईल याचा विचार केला आहे आपण ?

**दिवाण**—( पुटपुटत ) याचा परिणाम—याचा परिणाम—( येरझारा घालतो )

**पिरोज**—होय, याचा परिणाम ! विचार केला आहे याचा ? न्यायनिष्ठुरता म्हणजे अविचार नव्हे दिवाणसाहेब ! काय साधेल आम्हांला कैद केलं तर ?

**दिवाण**—तूं बोलतेस हें पिरोज ?

**पिरोज**—होय दिवाणसाहेब. तुम्हांला पूर्ण दारूबंदी व्हायला पाहिजे ना ?

**दिवाण**—म्हणून तुम्हांला सोडून देऊं ?

**पिरोज**—होय, म्हणूनच. पोटचे गोळे म्हणून नव्हे—वंशाच्छेद होईल म्हणून नव्हे—

**दिवाण**—दारुबंदीसाठीं या बूटलेंगर्सनां सोडून देऊं ! हाः हाः हाः ( हंसतो )

**मणि**—बूटलेगर्स ?—

**पिरोज**—होय मणि.

**मणि**—पिरोज—पिरोज—( मटकन् बसते )

**प्रभास**—नाहीं मणि, बूटलेगर नव्हे—नुसता एक दारुड्या—नि त्याच्या गुन्ह्यावर पांघरूण घालणारी ही त्याची धाकटी बहीण !—नव्हे आई !

**दिवाण**( कागद दाखवून ) मग हें काय ?—पेट्या नाहीं पाहिल्यास आतां ?—बूटलेगर नव्हे म्हणे ! प्रकाश, त्या पळपुट्यांच्या मागं कोण गेलं आहे ?

**प्रकाश**—नाहीं साहेब.

**दिवाण**—कां ?

**प्रकाश**—मी पळून जाऊं दिलं त्यांना.

**दिवाण**—कां ?

**प्रकाश**—दारूबंदीच्या तत्वासाठीं.

**दिवाण**—ऐका ! सगळेच बंडखोर निपजले ! मला तोंडघशी पाडण्याचा सर्वांनीं कटच केला आहे जसा ! ( बसतो ) ( प्रकाशला ) काय साधलं त्यांना पळायला लावून ?

**प्रकाश**—त्यांना पकडायचे आहे मला.

**दिवाण**—मग आतांच कां पकडलं नाहीं ?

**प्रकाश**—बाहेर पकडायचं आहे—इथं नव्हे—ते स्वस्थ बसणार नाहींत.

**पिरोज**—शाबास !

**प्रकाश**—थँक्यू !—

**प्रभास**—ते स्वस्थ बसणार नाहींत !—खरं आहे—मला स्वस्थ बसावं लागणार आतां ! अगदीं बिनतक्रार—बिनबोभाट स्वस्थ बसावं लागणार मला !—

**पिरोज**—तुला वाईट वाटतं ?

**प्रभास**—मला काय वाटतं तें तुला कसं सांगूं ?—तुमचे दोघांचेही माझ्यावर आजवर मोठे उपकार झाले—

**पिरोज**—दोघांचे ?

**प्रभास**—होय. जरा उठतां कां बाबा ? ( दिवाण पहात रहातो ) कर्तबगार माणसांची दृष्टी मोठी दूरवर असते, म्हणून त्यांच्याकरवीं मोठमोठीं कार्यं घडून येतात. पण हीं दूरदृष्टीचीं माणसं एक मोठी चूक करीत असतात—साऱ्या मोठ्या माणसांच्या चरित्रांत आपल्याला हेंच दिसून येतं. हीं मोठीं माणसं जेव्हां दूरवर नजर फेंकीत असतात त्यावेळीं खालीं पायाकडे पाहात नाहींत. त्यांच्या पायाजवळ असणाऱ्या माणसांना म्हणूनच त्यांच्या पायतळीं सुरुंग लावणं सुलभ जातं. ऐनवेळीं या मोठ्या माणसांचा भडका उडतो, तो त्यांच्या या दूरदृष्टीमुळं. जरा उठतां का बाबा ?—( दिवाण नकळत उठून दूर होतो. प्रकाश खुर्चीचा तळ उचलतो ) पहा, वैऱ्याला राहायला किती सुरक्षित जागा आहे ही—( बाटल्या काढून ) या घ्या प्रकाश—( सर्व स्तब्ध होतात ) प्रकाश पडला ?

**प्रकाश**—होय. प्रकाश अगदीं सपशेल पडला.

**प्रभास**—आतां द्या मला पोलिसच्या ताब्यांत.

**प्रकाश**—नाहीं.

**प्रभास**—बाबांचा—दिवाणसाहेबांचा हुकूम झाला तरी ?

**प्रकाश**—नाहीं. त्या दोघांना मी पळून जाऊं कां दिलं ? तुम्हांला पकडायचं होतं म्हणून ?

**प्रभास**—त्यांची माझी ताटातूट तर केलीत ?

**प्रकाश**—अगदीं बरोबर. आतां केव्हांही त्यांना नाटीवर पकडीन.

**दिवाण**—शाबास !

**प्रभास**—पाहिलंस पिरोज, दिवाणसाहेबांतला पुत्रवत्सल बाप जागा झाला !

**पिरोज**—दादा !

**प्रभास**—दटावूं नकोस. खरं बोलायची वेळ ही आहे ! मणि, इकडे ये. तुला आतां कळलं—मी दारुड्या आहें—नव्हे होतों. यापुढं दारू मिळायचे मार्ग खुंटले आहेत, म्हणून मला दारू सोडावी लागणार. माझ्या खुषीनं नव्हे—तुझ्या खुषीसाठींही नव्हे—नाइलाजानं. मजुरांनीं जशी दारू सोडली तशी—नाइलाजानं. आतां त्या मजुरांना पटूं लागलं—दारुबंदीला आतां तेच मदत करूं लागले. कुणी सांगावं, कदाचित तसाच परिणाम माझ्यावरही होईल ! दारू आंगवळणी पडली होती तशी दारूबंदीही आंगवळणी पडेल—सक्ती करावी लागते, बंदी करावी लागते, ती एवढ्यासाठीं.

**दिवाण**—पटलं ना हें तुला ?

**प्रभास**—( हंसून ) हें केव्हांच पटलं होतं मला. पण तुमच्या हातून जे हे अत्याचार चालले आहेत—

**दिवाण**—माझ्या हातून अत्याचार ?

**प्रभास**—होय. गरीबगुरीबांचा हा पैसा कां उधळतां आहांत ?

**दिवाण**—उधळतों आहें ?

**प्रभास**—होय. गरीबांची दारुबंदी झाली—ते सुखी झाले. एकेकाळीं अमेरिकेचं जसं कोटकल्याण झालं होतं, तसंच आतां हिंदुस्थानचंही होणार असं वाटूं लागलं—तोंच तुम्हाला ही दुर्बुद्धी आठवली—

**दिवाण**—प्रभास !

**प्रभास**—होय—दुर्बुद्धी आठवली. श्रीमंतांची दारू बंद झाली पाहिजे म्हणून चंग बांधून बसलांत. श्रीमंतांची दारू कधीं बंद झाली आहे ? हा मीच पहा, प्रत्यक्ष बापाच्या—असल्या कर्दनकाळ दिवाणाच्या डोळ्यांत धूळ टाकून दारू पीत होतों. कां ? पैसे खुळखुळत होते म्हणून. एकसवा रुपयाच्या जागीं पंचवीस रुपये सहज उडवून देतां येत होते म्हणून ! पैसे आहेत तोंपर्यंत श्रीमंत लोक दारू पीणार—आणि या मूठभर श्रीमंताची दारू बंद व्हावी म्हणून तुम्ही कोटिशः गरिबांचे पैसे खर्च करून धरपकडी करीत बसणार ? अमेरिकेनं हीच चूक केली म्हणून अमेरिका पुनः दारुडी बनली. ती चूक तुम्ही करूं नका. पैसे आहेत—पीतील—मरतील—जातील जहान्नममधें—जाऊं द्यात की ! पकडले गेले हे श्रीमंत, तर त्यांना चांगली दहापांच वर्षांची शिक्षा ठोठावा. दंड करूं नका—दंडाचे पैसे भरून ते पुनः दारू पीतील !—

शिक्षा ठोठावा—सक्तमजुरी द्या. मरूंद्यात कीं त्यांना ! गरीब सुखी झाले ना ? त्यांची तेवढी काळजी घ्या. बेवडा सुरू होणार नाहीं एवढी काळजी घ्या. ऐकलंत प्रकाश, दारुबंदी म्हणजे बेवडाबंदी—शॅंपेनबंदी नव्हे.—शॅंपेन-व्हिस्की विलायतेंत पिकताहेत, तोंवर हे मूठभर श्रीमंत ती पीत राहाणार. ती बंद होणार नाहीं. अमेरिकेनं शिकवलेला हा धडा घ्या नि सावध व्हा.

**दिवाण**—( त्याची पाठ थोपटून ) शाबास ! माझ्या मुला, शाबास !

[ पिरोज एका बाजूनं येऊन प्रभासचा हात धरते दुसऱ्या बाजूनं माणि त्याला बिलगते—बाहेर स्वयंसेवक ‘ वंदे मातरम् ’ गीत म्हणत आहेत—सर्व *attention* मधें राहातात. ]

( पडदा पडतो. )

ॐतत्सत्

# लेखकाचीं इतर पुस्तकें.

### नाटकें

कुंजविहारी
संजीवनी
सरस्वती
वरवर्णिनी
ह्याच मुलाचा बाप
समर्थ भिकारी ( चंद्रशेखर )
लयाचा लय ( नरकेसरी )
संन्याशाचा संसार
सत्तेचे गुलाम
पतित-पावन ( तुरुंगाच्या दारांत )
नवा खेळ
करग्रहण
करीन ती पूर्व
सोन्याचा कळस
जागती ज्योत
स्वयंसेवक
समोरासमोर

### लघु नाटकें

वज्रकुसुम
पापी पुण्य
संसार
नामानिराळा
सदा बंदिवान

### आगामी नाटकें

पायाचे दगड
अभिनव देश
कुणबी तुकाराम

### कादंबऱ्या

संसार कीं संन्यास
चिमणी
विधवा कुमारी
गोदू गोखले भाग १–२
धांवता धोटा
परतभेट
कुलदैवत
उघडझांप
विकारी वात्सल्य
वेणू वेलणकर
उमलती कळी
न पुजलेली देवता
मलबार हिल ( सोंगडी )
१९१४ नंतर
कुणाचा हा देश ?
भानगडगल्ली
पेटतें पाणी
त्याचा देव

### लघुकथा

स्वैरसंचार
षोडशी
वैमानिक हल्ला

### किरकोळ

आघात ( व्याख्यानें )
श्रुतिका ( श्राव्य प्रकरणें )
वाङ्मय आणि रंगभूमि ( निबंध )